


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

☐ अंक क्र. ३३५ : ऑक्टोबर ते डिसेंबर २०१०

---



प्रकाशक :

डॉ. माधवी वैद्य

प्रमुख कार्यवाह




महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

दूरभाष - ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**मेघा ग्राफिक सर्व्हिसेस,**
स.नं. १४/२३/४, घर नं. १५९८,
मोती बेकरीमागे, धायरी, पुणे - ४११ ०४१

मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि.,**
२५/१० नांदेड फाटा,
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : डिसेंबर, २०१०

संपादकीय

# शताब्दीच्या उंबरठ्यावर महाराष्ट्र साहित्य पत्रिका !

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

रविवार, दि. ९ मार्च १९१३ रोजी मुंबई येथे गिरगावात डॉ. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांच्या दिवाणखान्यात त्यांच्याच अध्यक्षतेखाली झालेल्या सभेत 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' म्हणून एक लहानसे मासिक काढावे; आणि आज अस्तित्वात असलेल्या एखाद्या भारदस्त मासिकास जोडूनच सुमारे ८-१२ पृष्ठांची (रॉयल आक्टेव्हो आकारात काढावी) असे ठरले. सदर भारदस्त मासिक म्हणजे 'विविधज्ञान विस्तार' होय. त्याची पुरवणी म्हणून जुलै १९१३ पासून पत्रिका सुरू करावी; असा ठराव झाला होता. तथापि, ऑगस्ट १९१३ पासून विविधज्ञानविस्ताराची पुरवणी म्हणून ती प्रसिद्ध होऊ लागली. २२ मार्च १९२८ पासून ती स्वतंत्रपणे त्रैमासिकाच्या स्वरूपात प्रकाशित होऊ लागली.

*'...तेजस्वि नौ अधीतं अस्तु ।*
*मा विद्विषावहै । ॐशांतिः शांतिः शांतिः ॥'*

हे पत्रिकेचे बोधवाक्य होते.

'आमचे त्रिविध ताप (काय-वाचा-मनाचे) किंवा आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक म्हणून असलेली दुःखे शांत व्हावीत. आमचे अध्ययन तेजस्वी राहो. आम्ही कुणाचाही द्वेष-तिरस्कार करू नये.' गुरुगृही अध्ययन-अध्यापनाच्या प्रक्रियेत प्रारंभी आणि शेवटी ही प्रार्थना म्हणण्याची पद्धत होतीच. उपनिषधांच्या आरंभी आणि अखेरीस ही उदात्त प्रार्थना नोंदलेली आहे. कोणतेही अध्ययन-अध्यापन द्वेष तिरस्कार-वैरभावनेच्या पलिकडचे असावे. कोणत्याही ज्ञानाचा तिरस्कार न करता; ते आत्मसात करून अधिकाधिक सतेज कसे होईल, हाच अभ्यासकांचा आणि अध्यापकांचा ध्यास असला पाहिजे; असे पाध्ये-भाटवडेकर-मोरमकर इत्यादि संस्थापकांचे धोरण होते. साहित्यपत्रिका स्वयंपूर्ण असली पाहिजे. ती कोणत्याही एकाच विचाराच्या अंकित असता कामा नये. सर्व विद्याशाखा आणि सर्व प्रकारच्या अभ्यासकांनी मराठी भाषेला-साहित्याला-समृद्ध करावे. भाषेतील-नव्या-जुन्या ग्रंथांचे आणि अन्य भाषांमधील उदात्त कृतीचे रसिकतेने अध्ययन करणे आवश्यक आहे.

साहित्यपत्रिका, ऑगस्ट १९२८ पासून स्वतंत्र स्वरूपात जरी प्रकाशित होऊ लागली, तरी विविधज्ञान विस्ताराचे बोट धरून ती प्रकाशित होत होती; हे विसरणे योग्य नाही. त्यामुळे ऑगस्ट १९१३ हेच जन्मवर्ष आणि ९ मार्च १९१३ चा म.सा.प.चा ठराव हीच जन्मतारीख मानणे योग्य होईल. त्यादृष्टीने पत्रिका आता ९८ वर्षांची झाली असून येत्या मार्च २०११ मध्ये ९९ व्या वर्षात पदार्पण करीत आहे. या अर्थाने महाराष्ट्र साहित्य पत्रिका शताब्दीच्या उंबरठ्यावर आहे.

साहित्यपत्रिका अव्याहतपणे प्रसिद्ध होत आहे. अनेक प्रतिष्ठित, साहित्याला वाहिलेली नियतकालिके बंद पडली. कारण आर्थिक नियोजन करणे खूप अवघड काम असते. परंतु महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ने हे कार्य थांबू दिले नाही. त्याला आता ९९ वे वर्ष लागेल; आणि २०१३ मध्ये शंभर वर्षे पूर्ण होतील.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादकपदाची जबाबदारी मी स्वीकारली; त्यास आता सहा वर्षे पूर्ण झाली असून एकूण २५ अंक माझ्या संपादकमंडळाने प्रसिद्ध केले आहेत. भूतपूर्व संपादक डॉ. अ. वा. कुलकर्णी यांच्या अकाली निधनाने रिक्त झालेल्या संपादकपदावर माझी जून २००४ पासून (अंक क्र. ३१० पासून) नियुक्ती झाली. मार्च २००६ पर्यंत (अंक ३१६ पर्यंत) एकूण सात अंकांचे संपादनकार्य पूर्ण झाल्यानंतर, नव्या कार्यकारी मंडळाने, २६ मे २००६ रोजी माझी संपादकपदी फेरनिवड केली. नव्या संपादकमंडळात डॉ. किसन पाटील (जळगाव), श्री. मधू नेने (वाई), श्री. पद्माकर कुलकर्णी (सोलापूर), श्री. अरुण मैड (अंबरनाथ), प्रा. रा. भ. शिंदे (बत्तीस शिराळा), प्रा. मिलिंद जोशी (पुणे) आणि स्वाती महाळंक (पुणे) यांचा समावेश आहे. तसेच संपादन-प्रकाशन कार्यातील महाराष्ट्र पातळीवर नावलौकिक असलेले परिषदेचे जुने जाणते कार्यकर्ते आणि विद्यमान कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी पत्रिकेच्या



अनुक्रमणिका

आंतरबाह्य स्वरूपात बदल घडवून आणण्यात मोलाचे सहकार्य केले. पत्रिकेची आर्थिक बाजू सांभाळण्यासाठी, त्यांच्या संपर्कामुळे अंकांना जाहिरातीचे भरघोस आर्थिक सहकार्य लाभले. श्री. रत्नाकर कुलकर्णी आणि डॉ. अ. वा. संगमनेरकर यांच्या अनुभवाचे बहुमोल सहकार्य लाभले. प्रा. मिलिंद जोशी आणि स्वाती महाळंक यांनी पत्रिकेचे नवे सदर 'निवडक नवे' सांभाळले. प्रमुख कार्यवाहांकडून कार्यवृत्ताची माहिती घेऊन त्याचे शब्दांकन करण्याचे महत्त्वाचे काम श्री. दीपक करंदीकर यांनी केले.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका 'आकर्षक आणि वाचनीय' व्हावी म्हणून, तसेच संशोधन आणि समीक्षा ही परिभाषेच्या दुर्बोधतेत न अडकता सुबोध व्हावी म्हणून कटाक्षाने लक्ष दिले आहे. पत्रिकेचा आकार पूर्वी डेमी आकारामध्ये होता. तो २००६ पासून 'डबल क्राऊन' ह्या आकारात आणि चार रंगी मुखपृष्ठ छपाई, अशा स्वरूपात निर्माण केला. असे आता २५ अंक झाले असून हा २६वा अंक सभासदांच्या हाती देत आहोत.

गेल्या २५-२६ अंकांत विज्ञानकथा विशेषांक, बोलीभाषा विशेषांक, ग्रामीण साहित्य विशेषांक, संत तुकाराम आणि समर्थ रामदास, काव्यविशेषांक, संगीत नाटक विशेषांक असे वैशिष्ट्यपूर्ण अंक सादर केले आहेत. सोलापूरच्या सनराईज् प्रकाशन संस्थेने अंक क्र. ३२४ संत तुकाराम विशेषांक आणि अंक क्र. ३२५ समर्थ रामदास स्वामी विशेषांक ह्या दोन अंकांचे मिळून 'तुकाराम-रामदास' असे पुस्तक प्रकाशित केले आहे. (परिषदेच्या मान्यतेने.)

हा अंक क्र. ३३५ वा असून,, माझ्या संपादक-मंडळाखाली हा २६वा अंक संपादित केला आहे. मार्च २०११ चा अंक २७वा असून त्यात रौप्यमहोत्सवी आढावा घेण्यात येईल.

८४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावर ज्येष्ठ पत्रकार आणि परिवर्तनाचा ध्यास घेतलेले साहित्यिक मा. उत्तम कांबळे यांची निवड झाल्याबद्दल त्यांचे महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे हार्दिक अभिनंदन ! त्यांच्या साहित्य संपदेचा आढावा ह्या अंकात घेतला आहे.

लोकशाहीर विठ्ठल उमप 'भीमवासी' झाल्याचे दुःख आणि हुरहूर मनी बाळगून हे २६ व्या संपादकीयास अर्धविराम देतो.

## परिवर्तनाचा ध्यास : उत्तम कांबळे

परिवर्तनाचा ध्यास; हाच साहित्याचा श्वास मानणारे आणि निष्ठेने आपल्या लेखनाशी त्याचे इमान राखणारे मा. उत्तम कांबळे हे एक अस्वस्थमनस्क साहित्यिक आहेत. जीवनाच्या तळाशी असलेले 'नाही रे'- जीवन त्यांनी भोगले आहे. परंतु त्या भोगण्यात-वेदनेत ते कुंठित झाले नाहीत. अंधाऱ्या खाईत प्रकाशाचा एक किरण जरी दिसला तरी वनस्पती प्रकाशाकडे जाते. तो तिचा स्वभाव आहे. अंधारावर मात करून प्रकाशाची वाटचाल करणारे उत्तम कांबळे- परिवर्तनाच्या प्रकाशाकडे धाव घेतात. आपल्याला गवसलेली प्रकाशाची वाट आपल्यासारख्या सर्वांना दिसावी म्हणून आणि जागतिकीकरणाची वाटचाल करणाऱ्या भारताला जुने-बुरसटलेले मानदंड कितपत उपयोगी ठरतील ह्या विचाराने त्यांची लेखणी 'अस्वस्थ' आहे. 'माणसांच्या कथा', 'माणसांचे रंग' न्याहाळताना ह्या 'अदृश्य संघर्षाचे' ते सतत चिंतन करतात. साहित्याच्या सर्व विभ्रमांना आवाहन करून त्यातून ह्या 'न दिसणाऱ्या लढाईला' प्रकट करू पाहतात. मग कथा असो, कादंबरी असो, कविता असो की संपादने असोत. कधी साहित्याच्या विस्तृत स्वरूपात, तर कधी 'थोडसं वेगळं' अशा लालित्यात, सामाजिक न्यायाला ग्रासणाऱ्या प्रथा, कुंभमेळा, संशोधनपर लेख, पुस्तिका, पोस्टर पोएट्री... एक ना अनेक मार्गांनी त्यांची लेखणी आपला सामाजिक न्याय आणि परिवर्तनाचा ध्यास प्रकट करते... तरीही आपले ईप्सित अमाप अपूर्ण असल्याची खंत बाळगते आणि चिरंतन अस्वस्थतेच्या काटेरी मुकुटाच्या वेदनाच बोलते.

त्यांच्या आत्मचरित्राचे तीन स्वाभाविक विभाग हे त्यांच्या प्रामाणिक साहित्य प्रवाहाचे द्योतक आहेत.

परिषदेतर्फे त्यांचे हार्दिक अभिनंदन व शुभेच्छा !

-सु. कुलकर्णी

(संपादक - महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०)

संपर्क : ७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग, अहमदनगर.
दूरभाष : ०२४१-२४२९७५५

म. सा. परिषद पुणेच्या वतीने अभिनंदन !

# ८४व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष पत्रकार- साहित्यिक उत्तम कांबळे यांची साहित्य-संपदा आणि परिचय (बहुआयामी व्यक्तिमत्त्व)

नाव : **उत्तम मारूती कांबळे**

जन्मतारीख : ३१ मे १९५६

शिक्षण : टाकळीवाडी, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर

प्राथमिक शिक्षण : टाकळीवाडी आणि शिरगुप्पी (बेळगाव)

माध्यमिक शिक्षण : रायबाग, जि. बेळगाव.

महाविद्यालयीन शिक्षण : सांगली व कोल्हापूर

वैशिष्ट्ये : शेतमजूर कुटुंब, आर्थिक चणचणीमुळे विविध कष्टांची कामे करून (उदा. हमाली, शेतमजूर, बांधकाम मजूर, कंपाऊंडर, पेपर विकणारा इ. कामे करून) शिक्षणपूर्ण.

शिक्षण : बी.ए. (राज्यशास्त्र) १९७८, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

व्यवसाय : पत्रकार-सध्या 'सकाळ' माध्यमसमूहाचे मुख्य संपादक.

**साहित्य संपदा : पाचकथासंग्रह :**

१ रंग माणसांचे (१९९५)

२. कावळे आणि माणसे (१९९९)

३. कथा माणसांच्या (२००१)

४. न दिसणारी लढाई (२००८)

५. परत्या (२०१०)

**दोन कादंबऱ्या :** १) श्राद्ध (१९८६)

२) अस्वस्थ नायक (२०००)

**दोन काव्यसंग्रह :**

१) जागतिकीकरणात माझी कविता (२००६)

२) नाशिक, तू एक सुंदर कविता (२००८)

**तीन स्वरुपात आत्मचरित्र :**

वाट तुडविताना (२००३)

१) 'ग्रंथ हेच नायक - ग्रंथांच्या बळावर आयुष्य घडविता येते. ग्रंथांमुळेच घडते.' ह्या विचाराभोवती घडणारे जीवन.) कर्नाटक, उत्तर महाराष्ट्र, मुंबई, स्वामी रामतीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड इ. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात समावेश.

२) आत्मचरित्र : 'आई समजून घेताना' (२००६) ते २०१० एकूण आठ आवृत्या. (आईला समजून घेण्याचा सर्वव्यापी प्रयत्न)

३) एका स्वागताध्यक्षाची डायरी (२००८) ८१व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे कार्याध्यक्ष म्हणून काम करताना आलेल्या अनुभवांचे कथन

**४) तीन ललितलेखसंग्रह :**

१) थोडसं वेगळं (२००२)

२) कुंभमेळ्यात भैरू (२००३)

३) निवडणुकीत भैरी (२००४)

**पाच संशोधनपर लेखसंग्रह**

१) देवदासी आणि नग्नपूजा (१९८८)

२) भटक्याचे लग्न (१९८८)

३) कुंभमेळा साधूंचा की संधीसाधूंचा (१९९१)

४) अनिष्ट प्रथा (१९९१)

५) वामनदादांच्या गीतातील भीमदर्शन (२००४)

**सात प्रकारची संपादने :**

१) प्रथा अशी न्यारी (१९९१)

२) 'झोत' : सामाजिक न्यायावर (२००१)

३) जागतिकीकरणाची अरिष्टे (२०१०)

४) याशिवाय डॉ. रावसाहेब कसबे, कविवर्य नारायण सुर्वे, डॉ. सुशिलकुमार लवाटे इ. च्या मुलाखतींवर आधारित ग्रंथ (२००६ व २००८)

५) कवितांचे संपादन - गजाआडच्या कविता (२००२) जागतिकीकरणाच्या कविता (२००९)

६) संशोधनपर संपादन : शेतकऱ्यांच्या आत्महत्या : एक शोध (२००६)

७) 'शब्ददीप' आणि 'सकाळ नाशिक आवृत्ती' ह्या दिवाळी अंकांचे संपादन.

**दहा पुस्तिका :**

१) नव्या शतकात संतसाहित्य- टिकेल काय ? (१९९८)

२) जागतिकीकरण आणि दलितांचे प्रश्न (२००२)

३) राजर्षि शाहू महाराज आणि महिला मुक्ती (२००३)

४) राजर्षि शाहू महाराज आणि वेदोक्त प्रकरण (२००४)
५) महात्मा फुले यांची जलनीती (२००५)
६) आंबेडकरी साहित्य (२००८)
७) नववे अ. भा. आंबेडकरी साहित्य संमेलनाचे अध्यक्षीय भाषण (२००६)
८) अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या कार्याध्यक्ष पदावरून केलेले भाषण (२००८)
९) बौद्ध धम्मसंगीती (२००८)
१०) ओबीसींचे राजकारण (२००८)

**तीन 'पोस्टर पोएट्री'**

१) हे नारायणा - २००४ (कविवर्य नारायण सुर्वे सार्व. वाचनालय, नाशिक)
२) पोरांसाठी चार शब्द : २००४ (विधान परिषदेत वाचन)
३) राबणाऱ्याचा विठ्ठल - २०१०,

५२ लेख (विविध माध्यमांमधून)

याशिवाय नियतकालिके, रेडिओ कार्यक्रम, शालेय पाठ्यपुस्तकात समावेश, ग्रंथांना प्रस्तावना, संपादित ग्रंथातील लेख इत्यादी माध्यमातून ५२ लेख.

**अनुवादित साहित्य : (४८)**

सात ग्रंथ, २७ कथा, १४ कविता.

उत्तम कांबळे यांच्या साहित्यावर संशोधन (१२)

चार एम् फिल, आठ पीएच्डी, विविध मानसन्मान, अध्यक्षपदे, सामाजिक कार्यात सहभाग, विविधसंस्था-समित्यात सहभाग.

एकूण २२ साहित्य पुरस्कार; आणि साहित्यसेवा पुरस्कार, पत्रकारिता क्षेत्रात २३ पुरस्कार- तसेच परदेशात अभ्यास दौरे, भारत देशाचे प्रतिनिधित्व म्हणून राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, पंतप्रधान यांच्याबरोबर परदेश दौरे. उत्तम कांबळे यांचे हे बहुआयामी कर्तृत्व !



## लोकशाहीर विठ्ठल उमप

नागपूर येथे दीक्षाभूमीवर २७ नोव्हेंबर २०१० रोजी लोकशाहीर विठ्ठल उमप यांचे 'भीमवासी' होणे; मनाला चटका लावणारे आहे. लाखो भीमभक्तांच्या साक्षीने त्यांना हा मरणसोहळा लाभला. दादरच्या चैत्यभूमीवर त्यांचे अंत्यदर्शन घेण्यासाठी अक्षरशः हजारोंचा जनसमुदाय आला होता.

शाहीर हा लोकभावनेला बोलतं करणारा खरा लोकप्रतिनिधी असतो. तो लोकभावना गात असतो. पराक्रमाचे, उदात्त आणि उत्कट-भव्य कार्याचे तो जसा वीररसपूर्ण नाट्यमय आविष्कार घडवितो; तशी उदात्त उत्कट करुणाही त्याच्या वाणीतून वहात असते. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत १०५ हुतात्म्यांपैकी एका हुतात्म्याचा करुण आलाप-

*'माझी मैना गावाकडं राहिली...*
*माझ्या मनाची काहिली झाली ।'*

गाताना शाहीर उमपांच्या गळ्यातून करुणरस पाझरत असे; तसेच 'भीम-गीत' गाताना, 'भीमभक्ती' साक्षात् होई. हाच 'भीमभक्त' अभंग, ओव्या, भारूडे, पोवाडे, लावण्या, गझल इ. गाताना तन्मय होऊन नर्तन करीत असे. त्यावेळी हजारोंचा समुदाय प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे नर्तन करीत असे. लोकभावनेशी एकरूप झालेले शाहीर उमप यांचे दर्शन विलोभनीय होते.

त्यांचे 'जांभूळ-आख्यान' जसे प्रेक्षणीय तसे मननीय आहे. डॉ. गंगाधर मोरजेंसारख्या लोकसाहित्याच्या अभ्यासकाने म. सा. पत्रिकेच्या अंकातच केलेले चिंतन अभ्यासकांसाठी उपयुक्त आहे.

गेली सात दशके लोकलेचाच ध्यास घेतलेल्या ह्या लोकशाहिराने जीवनाला गौरविले आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेने शताब्दीच्या कार्यक्रमात लोकशाहीर विठ्ठल उमपांना गौरविले होते. आता त्यांच्यावर निरोपाचे चार शब्द लिहिताना त्यांचे सुपुत्र भास्कर उमप यांच्या शब्दातच भावना व्यक्त कराव्याश्या वाटतात-

*'रसिक मानवप्राणी-*
*आज आले सारे तुझ्याद्वारी ।*
*भास्कराची बोले वाणी,*
*डोळ्यातले रडे पाणी,*
*दुःखी झाली तुझी गाणी,*
*कसा देऊ तुजला अग्नी ॥'---?*

शाहीर विठ्ठल उमप यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेचा मानाचा मुजरा !



# शब्द आणि स्वप्नबांधणीतील घावांचे शीलालेख : 'वाऱ्याने हलते रान'

- डॉ. चंद्रकांत पोतदार

*[ निर्मितीच्या अज्ञात झऱ्याचे मूळ शोधणारी कवी ग्रेस यांची कविता गूढतेच्या अनामिक मार्गावर रममाण होते. त्यांचे ललितलेखनही त्याच काव्यगर्भ वाटेवरून मानवी अनुभूतीच्या तळाचा शोध घेते. –संपादक ]*

व्यक्त-अव्यक्ताच्या पातळीवर विचारसूत्रातून बांधलेली निर्मितीक्षम शृंखला म्हणजे कवी ग्रेस यांच्या ललितबंधांचे लेखन होय. विचार आणि भावनांना कृतीची जोड देताना शब्दसामर्थ्याइतका प्रगल्भ सहकारी नाही, शिवाय मनाच्या संवेदनशीलतेचा गुंता उलगडताना हळुवार असे एक मूक आक्रंदनही प्रकटते. या सगळ्या पार्श्वभूमीवर कवी-लेखक ग्रेस यांचा 'वाऱ्याने हलते रान' हा ललितबंधांचा आविष्कारलेला ग्रंथ महत्त्वाचा वाटतो.

कवी ग्रेस यांच्या लेखनाची वृत्ती स्वतंत्र वाण्याची आहे. दुःखाला कवेत घेत, निर्मितीच्या क्षणांना मुठीत पकडत घनदाट सावलीमागे धावणाऱ्या मृगजळाचे आखीव-रेखीव बांधकाम करत गूढतेला व्यक्त करण्याची त्यांची स्वतंत्र शैली आहे. मुळातच खोल गर्तेतला परिसर मांडणे, ही त्यांच्या लेखनाची आकर्षकता आहे. विचारांना अधोरेखित करत करत एखादी गूढतेची वलयांकितता वाचकाला गुंतवून ठेवते. नाविन्याचा शोध घेतानाच काळोखाच्या गर्द सावलीला ते अधिक गडदपणे व्यक्त करतात. दुःखी बगळ्यांची तुटलेली शुभ्रमाळ असो; की काळोखाच्या परमात्म्यावरचे सावट असो, त्यातूनही ते विस्तीर्ण अशा गूढतेचाच शोध घेत राहतात. मनाच्या कॅनव्हॉसवर उमटणाऱ्या शब्दनिर्मितीला हळवे कारुण्य, अंगभूत अशी एक जणू लयच सापडली आहे, असे सतत वाटत राहते. बहुतेक लेखांमधून व्यक्त होणारी कारुण्याची जाणीव दुःखाच्या मूळ प्रवाहालाच मांडत राहते. या ग्रंथातील असे ललितबंध सातत्याने कारुण्याला मांडतात.

वेदनांचा मुका स्वर मांडताना पुनर्निर्मितीच्या प्रक्रियेलाच ते अधिक ठळकपणे व्यक्त करतात. नाविन्याचा शोध घेताना सृजनशील संदर्भांची मांडणी खूप काही सांगणारी अशी आहे. 'काव्यसत्य आणि काव्यन्याय या सौंदर्यसत्तेच्या दोन उपाधी आहेत.' ही वैचारिकतेची प्रामाणिक खूण खूप खोलवरचा उसासा मांडते; तर कारुण्याचा संदर्भही संहितेच्या विचारधारेतून अभिव्यक्त होतो. उदा. 'कातरवेळी मंगळसूत्रावर हात धरून, माझे माणूस देवा, सुखरूप परत येऊ दे म्हणून प्रार्थनाबद्ध झालेली प्रौढा; आणि त्याच कातरवेळी शंकराच्या तसविरीसमोर हात जोडून, 'मायबापा ! आज माझ्या वाट्याला चार गिऱ्हाईके जास्त येऊ देत, खेड्यावरून मुलीचे पत्र आले आहे, परीक्षेचा फॉर्म भरण्यासाठी पैसे हवेत म्हणून' असा धावा करणारी वेश्या, यांच्यातील अंतर मोजायचे की सगळा हवाला दोघींच्या अभ्यंतरावर, एकात्मभावाने ठेवायचा ? आणि मग मूळ संहितेतील करुणा माझ्या कवितेच्या चरणात अशशी येऊन उभी राहिली-

हले काचपात्रातली वेल साधी
निनादून घंटा तश्या वाकल्या
खिळ्यांना दिसेना कुठे क्रूस न्यावा
प्रभूने अशा पापण्या झाकल्या...

काचापात्रातील वेलीचा हिंडोल कसले सूचन करतो?' (पृष्ठ १८)

कवी ग्रेस यांच्या लेखनात असे वेदनांचे मूळ आक्रंदन आहे. ही वेदना स्वतःची- स्वतःपुरती असणारी एक वैचारिकता मांडते. विचार-भावना यालाही एक वैश्विक स्वरूप ते देतात. सृजनाचे पावलोपावली जाणवणारे संदर्भ नवनिर्मितीच्या खुणा मांडतात. विचारांची अखंड साखळी मांडताना घेतलेला मनाचा शोध जाणवतो; तर कधी जगाची विस्तीर्ण गूढ प्रवासाची जणू दिशाच मांडली आहे. मिथिलेची आठवण, रिल्के, फादर सेरेक यांच्या आठवणी अशाच पद्धतीने या ललितबंधसंग्रहातून

आल्या आहेत. फादरशी हातमिळवणी केल्यावर जाणवणारे सद्‌गदित दुःखाचे भरजरी परिमाणही खूप महत्त्वाचे वाटते. जीवनातल्या अपरिहार्य अवस्थांना सामोरे जाताना मनाचा कौलही अनेकंदा आजमावा लागतो, दुबळ्या माणसांचा पळपुटेपणा आणि आत्म्याचा एकट आश्रय यातूनच एक संघर्षमय जाणीव व्यक्त होते. भ्रम आणि वास्तवाचा शोध घेत अंतर्मनाची चाहूल व्यक्त करताना कलाकृतीच्या निर्मितीचे काही संकेत खूप आतून येणारे असे आहेत. 'कलाकृतीची निर्मिती करताना पुनर्मांडणीच्या रूपाने तो जीवनाच्या नीतिसंपन्न मांडणीचे केवळ करीत नसतो तर त्याची अंतिम सौंदर्यसंपन्नता प्रस्तावित करीत असतो. जीवनाला हा साक्षात्कारी चमत्कार कधीच साधत नसतो. पण अशा साक्षात्कारी चमत्कारांची मांडणी करीत जाणे, हेच तर कलेचे अधिष्ठान असते.' (पृष्ठ ३७) ही कलेविषयीची, कलेच्या निर्मितीविषयीची एक प्रामाणिक भूमिका खूप विचारप्रवर्तन मांडणारी आहे. निर्मिती आणि पुनर्निर्मिती यातून एक कलेची अंगभूत लय सिद्ध होणारी आहे.

घटना-उदात्त विचार-भाषेची संभ्रमावस्था या सगळ्यातून एक विलक्षण अशी गतिमानता दिसते. मनाला गुंतवून ठेवणारी, मोहविणारी आणि भाषिक सामर्थ्याचे गद्य-पद्यमिश्रित रूप व्यक्त करणारी आत्मरूप भाषा म्हणजे जणू जिव्हाळ्याचा विषय बनतो. दंतकथा, लोककथा यांची मांडणी, पौराणिक कथांच्या संदर्भाची गरज या सगळ्यातून साकारणारे ललितबंध म्हणजे एक भावनेचा प्रामाणिक आविष्कार आहे. पौराणिक व्यक्तिरेखा आणि त्यांचे दाखले, इंग्रजी अवतरणे यातून रामायण-महाभारतातल्या कित्येक व्यक्तिरेखांविषयीची ओढ व प्रत्येक पात्राचा खोलवरचा विचार, व्यासंगी भूमिका या सगळ्यातून भाषिक अभिव्यक्तीच जणू प्रकटल्याचे जाणवते. शाश्वत आणि अशाश्वताची परिमाणे वापरतानाच शब्दांचे भांडारही आपोआप खुले होते. दैवभाव अनुभवतानाची अनेकदा जाणवणारी गोची वाचकांची संभ्रमित अवस्था निर्माण करून देते.

ग्रेस यांच्या लेखनाला एक अंगभूत लय आहे. Languauge within laguage या उक्तीप्रमाणे भाषेची व्यापकता ते मांडतात. भाषेची निर्मिती, भाषिक संकेत, भाषेचे अंगभूत वळण, शब्दसंवादातून होणारा अर्थबोध, दुःखाशी असणारी जवळिकता, सृजनाचे विस्तीर्ण संदर्भ, अनेकदा भेटणाऱ्या विविध व्यक्तिरेखा या सगळ्यातून एक वाङ्मयीन ओळख निर्माण करतानाच स्वतःची स्वतंत्र सत्तास्थानेच जणू निर्माण केली आहेत, असे वाटू लागते. शब्दमिश्रित ललितबंधाला एक काव्यमय नवनिर्मितीची खूण सापडली आहे. ताऱ्यांची कुंडली शोधणे, स्मरणकथांची आकर्षक रुपे शोधणे, ऋतुंचा गाव शोधणे, सतत काही नाविन्यपूर्ण सापडते का ? याचा शोध घेणे, या सगळ्यातून हुलकावण्या देणाऱ्या आयुष्याला नव्या विचारप्रवाहात आणून मांडणे ही जणू ग्रेस यांची खासियतच. जीवनाची पुनर्निर्मिती असणारी कला आणि कलेचे तत्त्व त्यांनी आपल्या अखंडसाधनेतून उलगडले आहे. कलावंताचे जगणे म्हणजे हरघडी नव्याने घातला जाणारा जणूउखाणाच असतो. ऋतुपरिवर्तनाच्यावेळी मला उदासी घेरते. (पृ. १०८), किंवा सर्पाचे देखणेपणही नजरेत साठवताना येणारी भाषा काही वेगळेपण अधोरेखित करते.

*'सर्प देखणे सावज*
*दिव्य सर्पिणीचा फणा*
*काय ज्ञानिया ऐकतो*
*घणु असा घुणघुणा ?'* (पृष्ठ १०९)

पानापानावर अवतरणारी ग्रेस यांची भाषा प्रत्येक





अनुक्रमणिका

मनाला- कलावंत मनाला घडवते. प्रत्येक कलावंत आपल्या मगदुराप्रमाणे प्रार्थना करीत जातो. निर्मितीचा प्रदेश हातात पकडायचा; की काव्यप्रदेशांची निर्मिती करायची, हा तोलप्रश्न वाटतो तितका शब्दविपर्ययवादी नाही. कलावंताला असा विस्तीर्ण पट असावाच लागतो. दंतकथांची खोलवरची मांडणी, धूळवाटांच्या दंतकथा, आत्म्याची कासाविशी, सावलीत दडलेली भयानकता या सगळ्यातून कलावंताचे एक घडणे असते. पोपट पिंजऱ्यात असतो, पण पोपटाची आकर्षकता जशी महत्त्वाची तशीच पिंजऱ्याचीही असते. कावळा आणि झाड यांचा अन्योन्य संबंध, मोर-मोराचा पिसारा आणि ढगांशी असणारी मोराची मैत्री यातून एक जणू कथांचा अवकाशच व्यक्त होत असतो. पक्षांच्या कुळांचे देशांतर होणे म्हणजे जणू दुःखविभोर प्रतिमांची मांडणीच होय. हजारो मैलांचा प्रवास करण्यासाठी पहिल्या पावलाची गरज असते. पक्षी या प्रवासासाठी निघतानाच कधी धडपडतो; कारण खूप दूरवर पोहोचायचे असते; स्वप्नभूमीचा रस्ता शोधायचा असतो. ग्रेसांच्या लेखनाची दूरगामी वाट अशा स्वप्नभूमीची आहे. सातत्याने काही निर्मितीचा अंश मांडताना ते लिहितात, 'कलावंताच्या निर्मितीप्रक्रियेत, या विदग्ध लहरीत, तरलतेला एकाकीपणाचे वरदान लाभले आहे. मात्र एकाकीपणाला एकाकी होण्याची अभेद्य जोड देण्याशिवाय ही लहर चिमटीत पकडता येत नाही. लोवेलचे हृदय फोडणारे वाक्य आठवते ना ? 'They are slaves who dare not be in the right with two or three.' (पृष्ठ ४६)

कवी ग्रेस यांचे ललितलेखन म्हणजे भाषा-कथा-रात्र-पक्षी-गूढ प्रवास याच वाटेवरची वेधशाळा; त्यांच्या काव्यमय लेखनातूनअवतरते ती व्यापक अशी हळवी संवेदनशीलता. निसर्गसत्तेवर सौंदर्यसत्तेचे एक अधिष्ठान असते. सृजनशील सौंदर्याची आणि त्या सौंदर्यविश्वाची ताकद खूप मोठी. जीवनातील भल्या-बुऱ्या अनुभवाला सामोरे जाताना विनाशाच्या गर्तेतले एक व्यापक जगणे व्यक्त होत असते. कुठल्याही कलाकृतीत अवतरलेले जीवन हे पूर्णत्वाच्या काठाशी, एखादे गाव निवांतपणे निजले असावे तसे सौंदर्यसंपन्न दिसत असते. अशी खोलवरची विचारांची शृंखला मांडताना सृजनाची व्याप्ती, शब्दनिर्मितीतून सापडणारे बोध, काव्यपंक्तीचे विस्तृत प्रकटीकरण, कारुण्याचा स्पर्श आणि दुःखाचा मूळ स्रोत या सगळ्या ललितबंधातून व्यक्त होताना दिसतो. शब्दनिर्मिती, निर्मितीप्रक्रियेचा प्रवाह, पुनर्निर्मितीची प्रक्रिया, शब्दतळांचा अवकाश या सगळ्यातून प्रकटणारी विचारशृंखला खूप आतून व्यक्त होणारी आहे. अनाहताचे प्रकटन आणि संस्करणातील दैवी अनुभव मांडताना भास-आभासांचा समतोल राखत हे लेखन व्यक्त झाल्याचे जाणवते. कलेची निर्मिती म्हणजे जीवनालाच अधोरेखित करणे होय. जीवनाच्या क्रूर अनुसंधानाची जुळवाजुळव आणि प्रतिमा-संकेत यांच्याआधारे व्यक्त होणारी लयबद्ध काव्यशिल्प अनुभूती म्हणजे या ललितलेखनातील मुक्तसंचार होय. शब्द-निर्मितीचा आवाका, भास-आभासांची मांडणी, वेदनांचे मूक आक्रंदन, गूढतेकडे झुकणारी स्वाभाविकता, पाश्च्यात्य-संदर्भातली पात्रांची रेलचेल, सतत घेतला जाणारा नाविन्याचा शोध या सगळ्यातून व्यक्त होणारी ललितलेखनांची मूळ प्रवृत्ती संवेदनेच्या पातळीवर वाद-संवाद-विसंवाद याचे चित्र मांडते. पापणीतला काळोख, काळोखाच्या परमात्म्यावरचा अवकाश, काळोखाची हळूवार स्पंदनपाऊले, दुःखी बगळ्यांची माळ, गोंदणगावातील मंत्रधून, पडशाळेतील चांदणीचे काहूर, स्वप्नबांधणीतील घावांचे शीलालेख, स्मरणशाळेतील विस्मरणाच्या भयाचे दान, महावाक्यांच्या ओटीपोटातील विरामचिन्हांची करुणा, वेल्लोरच्या आठवणींचे पार-अपरंपार यासारख्या शीर्षकांतून व्यक्त होणारी शब्दसंवादाची खोल मांडणीही अर्थबोधाची जाणीव करून देणारी अशीच आहे. सांकेतिक भाषेतील अंतर्मनावर उमटणारे ठसे, गूढ प्रदेशाची एक स्वतंत्र खूण यामुळे विचार व चिंतन यातून एक अमूर्त अशी कलाकृती त्यांच्या लेखनातून जाणवते. ग्रेस यांचे लेखन भावते, पण ते कळत नाही; ही दुर्बोधतेची जाणीव का येते ? तर त्यामागे असणारी प्रतिमांची उंची, शब्दभांडाराचे विस्तृत व व्यापक रूप, करुणेचा स्पर्श व प्राचीन स्मृतिभ्रंशाची खोल पातळी, भाषेचे आणि



अनुक्रमणिका

शब्दांचे सौंदर्य, कल्पना व प्रतिकांचा व्यत होणारा खच या सगळ्यातून नक्षत्रझुंबरांचीच एक उत्कटता सतत जाणवते. या सगळ्या प्रवाहात आपण कसे वाहात जातो हे वाचक या नात्याने आपल्याला कळतही नाही, परिणामी दुर्बोधतेची जाणीव होते.

सारांश, 'वाऱ्याने हलते रान' या ललितबंधातून व्यक्त होणारी जाणीव मानवी अनुभूतींच्या तळाचा शोध घेते, शब्द-काव्य-रचना-संहिता यातूनही एक सौंदर्याचा अभिशाप व्यक्त होताना दिसतो. मनातल्या भावविभोरतेचे संभ्रम, गर्दीत असूनही एकटेपणाची खोलवरची भावना, निसर्गाची तत्त्वरूपे, दुःखाची विशिष्ट जातकुळी, आत्मनिवेदनाची भाषा, स्वतची अशी पृथगात्म सर्जनशील जाणीवेची शैली, दुःखाला कवटाळून जगण्याची वृत्ती, आत्मस्वराचे सूर आणि काव्यनिर्मितीचे बंध उलगडताना व्यक्त होणारी जणू रहस्यरणाची लिपी, भास-आभासांचा संभव आणि आत्म्याच्या आकांताचे अभिजात शिल्प, उखाणे-म्हणी-दंतकथा-लोककथा यांचा दीर्घ व्यासंग, इंग्रजी अवतरणांची व्यापकता, गद्याची पद्यमय भाषेतून व्यक्त होणारी शब्दकळा आणि स्वतःचा-स्वतःपुरता-स्वतःसाठीचा घुमणारा अनाहत नाद अशा असंख्य वैशिष्ट्यांसह हा ललितबंधांचा ग्रंथ खूप वाचनीय ठरतो. रक्तातील चांदणीचा डंख आणि रक्तातील सर्पिणीचा दंश, जीवनाची पडताळून पाहिली जाणारी मदार, जीवनाच्या पुनर्निर्मितीची परिपूर्ण वाढ, सुखदुःखाची भयाण रात्र, सत्याच्या कैवाराच्या सर्व हाका अनाथ होतील की काय, अशी वाटणारी भीती या सगळ्यातून दुःखाच्या मळभ दाटल्या काळोखाला जीवनाशयाच्या खोल व्यापकतेसाठी जणू शोधणेच सुरू असल्याचे दिसते. मुके क्षितिज, संध्याकाळ, निर्मितीचे क्षण, सृजनाची ओढ, क्षणभंगुर गोष्टीतून साकारणारे चिरंतन सत्य. या सगळ्याच गोष्टी चिंतनशीलतेतून उतरतात. शब्दांची पूजा करणारा हा कलावंत केवळ कलावंत नाही, तो सौंदर्याची साधनाही करणारा साधक आहे. निसर्गसत्ता-जीवनसत्ता यात सौंदर्यसत्तेचे अधिष्ठान मोठे आहे. खरा कलावंत हा आपल्या कलेचा प्रचारक नसतो, तर आपल्या सौंदर्यानुभवाचा तो प्रेरक असतो, हेच खरे !

❖❖❖

'वाऱ्याने हलते रान' (ललितलेख), कवी ग्रेस
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती - २००८,
पृष्ठसंख्या - १२२, मूल्य : १५०/-

**डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार**
मराठी अधिव्याख्याता, यशवंतराव चव्हाण महाविद्यालय,
हलकर्णी, ता. चंदगड, जि. कोल्हापूर.
संपर्क : ०२३२०-२३३१७०, मोबा. : ९४२३२८६४७९

# उत्कट, प्रगल्भ, अस्सल काव्याविष्कार

- अंजली कुलकर्णी

## ('कवितेच्या कविता' आणि 'आईच्या कविता' – अरुण शेवते)

अरुण शेवते हे कवितेच्या क्षेत्रातील एक वेगळ्या प्रकारचे नाव आहे. हे नाव दोन पद्धतीने वेगळे आहे. एक तर, व्यासपीठ किंवा इतर प्रकारे स्वतःचे नाव सातत्याने लोकांसमोर येत राहील असा प्रयत्न करणाऱ्यांमध्ये या कवीचे नाव नाही; मात्र कवितेसंबंधी किंवा एकंदरीतच साहित्य निर्मिती आणि संपादन या संबंधात सातत्याने काही तरी वेगळे काम करण्यात ते मग्न झालेले दिसतात. कवितेकडे ते आत्यंतिक आत्मियतेने आणि गांभीर्याने पाहतात. १९८० साली त्यांचा 'कावळ्यांच्या कविता' हा पहिला कवितासंग्रह प्रकाशित झाला आणि त्यानंतर आलेल्या 'तळघर', 'सई मालवणकर', 'कालिंदी', 'संदर्भ' सारख्या मालिका कवितांमधून आणि कवितासंग्रहांमधून त्यांचे हेच वृत्तिगांभीर्य अनुभवास येते. विशेषतः मालिकाकवितांमध्ये ते अधिक रमतात. एकाच अविच्छिन्न कविता बीजामधून फुटलेल्या आविष्काराच्या अनेक धुमाऱ्यांकडे आस्थापूर्वक नाजूकतेने पाहत बसणे त्यांना आवडत असावे.




नुकतेच त्यांची 'आईच्या कविता' ही मालिका कविता आणि 'कवितेच्या कविता' हा कवितासंग्रह 'ग्रंथाली'सारख्या दर्जेदार प्रकाशनसंस्थेकडून आलेले आहेत.

पुस्तकाच्या प्रारंभी 'आईच्या कविता'ना मालिका कविता तर 'कवितेच्या कवितां'ना कवितासंग्रह असे म्हटले आहे. परंतु 'कवितेच्या कविता' हीदेखील मालिका-कविताच आहे. कारण स्वतःमधील कवित्वाचा, स्वतःच्या कवितेच्या अंतःप्रेरणांचा शोध ह्याच एका अविच्छिन्न बीजापोटी यातील साऱ्याच कवितांचा जन्म झालेला आहे. वर्गिकरणाचा मुद्दा तसा गौणच. महत्त्वाचे हे आहे की 'कवितेच्या कविता' आणि 'आईच्या कवितां'च्या रुपाने अरुण शेवते यांच्या लोभस, दलदार आणि उत्कट काव्यप्रतिभेचे आविष्कार रसिकांसमोर आले आहेत.

तसे तर कविता काय किंवा आई काय माणसाच्या आत्यंतिक वैयक्तिक भावविश्वाचे हे दोन्ही घटक. आईविषयी वाटणाऱ्या आत्यंतिक उत्कट भावना आणि कवितेच्या निर्मितीपाठीमागेच रहस्यमय संवेदनकल्लोळ हे शब्दांत, त्यातही कवितेत मांडणे केवळ अवघड. आपल्या आयुष्यातल्या सर्वात जवळच्या व्यक्ती/बाबीविषयी लिहिताना भाषेतले सारे शब्द तोकडे पडत असल्याचा अनुभव कवी घेत असतो. तरीदेखील आईविषयी कविता लिहिली नाही असा कवी विरळा असेल. माधव ज्युलियन, यशवंतांपासून सर्वांनी आईविषयीची कृतज्ञता, प्रेम व्यक्त करण्यासाठी कवितेचे माध्यम वापरले आहे. अरुण शेवते यांनी तर 'आईच्या कविता' मालिकारुपातून मांडल्या आहेत. त्या मानाने कविताविषयक कविता मराठीत सामान्यतः कमी लिहिल्या गेलेल्या आहेत. स्वतःच्या सदासर्वदा वसणाऱ्या कवितेच्या चाफ्याचं तटस्थपणे निरीक्षण करणं; आणि त्याच्या अनावर वहरापाठीमागचं निर्मितीचं गूज कवितेतूनच खोलून व्यक्त करणं, ही तशी अवघडच गोष्ट. परंतु अरुण शेवते यांनी हे अवघड आव्हान लीलया पेललं आहे. हे आव्हान पेलण्यासाठी कवीला स्वतःचं घर उन्हात बांधावं लागतं; हे त्यांना माहीत आहे.

*"सकाळ, दुपार, संध्याकाळ*
*त्याचे आयुष्य*
*लुटून नेत असतात*
*मध्यरात्री जागत्या राहणाऱ्या कावळ्यासाठी*
*त्याचे घर सताड उघडे असते."*

सकाळ, दुपार, संध्याकाळ, मध्यरात्र, अशा दिवसाच्या कुठल्याही प्रहरी संवेदनांचे नभ दाटून येत



अनुक्रमणिका

असते. त्या अनुभवात चिंब भिजण्यासाठी कवीनं आपलं घर, आपलं हृदय, आपल्या संवेदनांची दारं कायम उघडी ठेवायची असतात. कवितेच्या शोधात तळमळत रस्त्यारस्त्यावरून हिंडताना कवीला स्वतःचं हरवलेलं अस्तित्व एखाद्या पहाटेच्यावेळी साक्षात्कारासारखं सापडतं, तो क्षण त्याच्या आयुष्यातला सर्वात मौलिक असतो. हे अस्वस्थपणच कवीला निर्मितीची शक्ती पुरवत असतं. म्हणूनच,

*''तुला एक सांगून ठेवतो*
*सावल्यांचा काळ जवळ आला असेल*
*अहेवपणी संपणार असतील रस्ते*
*तर तुझ्या घराकडे येताना*
*मी दिवा घेऊन येईन.''*



असा आत्मविश्वासही हेच निर्मितीक्षम अस्वस्थपण त्याला देत असतं. अमावस्येची वेदना प्राशून कवीची कविता सूर्यफुलांना जन्म देत असते. आणि 'हे राज्य काय कवींचे आहे' अशी खंतही त्याचवेळी जन्माला येत असते. देश, प्रांत, भाषा, धर्म, जात, लिंग या साऱ्या अडथळ्यांना ओलांडून संवेदनांचे एक निरभ्र, मोकळे, व्यापक आभाळ कवीला स्वतःच्या कवेत घ्यायचे आहे.

*'माझी कविता*
*कुठल्याही देशाचे*
*राष्ट्रगीत असणार नाही.'*

अशी एक संकुचिततेची कवाडे फाडून व्यापकतेच्या क्षितिजाला गवसणी घालणारी महामानवतावादी आस्था अरुण शेवते यांच्या कवितेतून, एखाद्या ओळीतून झरझरून आपल्या हृदयापर्यंत पोहोचते; आणि आपण कवीच्या प्रतिभेचा मोठा पैस पाहून अवाक् होतो. कुठल्यातरी एकाच देशाची राष्ट्रगीत बनून इतर सगळ्या जगासमोर अस्वीकाराची अभेद्य भिंत उभारणं शेवते यांना मान्य नाहीये. भूप्रदेशाच्या एखाद्या संकुचित तुकड्याइतकी स्वतःची कवितिक अस्मिता मर्यादित ठेवणं त्यांना मान्य नाही; असं लिहिणं हे केवळ एखाद्या महाकवीलाच शक्य आहे. हेही नेहमी शक्य नाही; कारण एरवी रोज भेटणारे धुक्याचे अवगुंठन पांघरून कविता अमूर्तात बसत असते, हे कवीला चांगलेच माहीत आहे.

कवितेतून कवितेचं तत्त्वज्ञान शोधण्याच्या या शेवते-यांच्या ध्यासाचं उत्तम विश्लेषण प्रा. सदानंद मोरे यांनी त्यांच्या प्रस्तावनेत केलं आहे.

कवितेविषयीचं प्रेम, उत्कटता, कुतूहल, आशा, निराशा, बळ, चिंतन आत्मविश्वास, हताशा अशा साऱ्याच संमिश्र संवेदनांनी हेलकावणाऱ्या उत्कट कविमनाचं दर्शन या कवितेच्या कवितांमधून घडतं.

*'कविते, तुला कसं जवळ ठेवू ?*
*आभाळ सुकं मन जाळीत*
*तुला कसं वाऱ्यावर सोडू ?*
*जितेपणी कफन बांधीत.'*

अशी एक तरल व्याकूळ अवस्था गाठत कविता एका उंचीला पोचते.

शेवते यांच्या 'आईच्या कविता' ही अशीच कवितेला एका उंचीवर पोहोचवणाऱ्या आहेत. डॉ. विजया राजाध्यक्ष यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे केवळ भावनेचा गहिवर, आईचे गौरवीकरण वा 'रोमँटिकीकरण' याच्यात शेवते अडकलेले नाहीत; आणि अलिप्तवृत्तीने आईविषयी लिहिणेही त्यांना (किंवा कुठल्याही कवीला) शक्य नाही. परंतु कलावंताचं मन, बेभानतेतही असलेलं एक भान जपल्यामुळे कवितांमध्ये एक कलात्मक आविष्कार आहे. वैयक्तिकतेचा अपरिहार्य स्पर्श आणि कलात्मक अंतर यामुळे या कविता आईविषयीच्या इतर अनेक कवितांचे आवर्तनाकार भेदून स्वतःच्या अशा एका वेगळ्याच अनुभवाकाशात पोहोचतात. एका वेगळ्या अनुभवाची अनुभूती वाचकांपर्यंत पोहोचवतात. मोरासारख्या वेगळ्या प्रतिमांनी आईच्या मायेला मखरात वसवतात.

*'आई, मोराची आई होते*
*मोरांच्या तांड्यात*
*सारे आयुष्य झोका घेत असते.'*

अशा असाधारणपणे ओळी लिहिल्या जातात.

*'ओठांवर आई शब्द लिहिला*
*तेव्हा श्रावण होता.'*

यासारख्या एखाद्याच बांधेसूद ओळीत, माफक शब्दांत आईचं श्रावण असणं. श्रावण असणं म्हणजे

रिमझिम झरणाऱ्या मायेच्या पावसाच्या धारा, श्रावण असणं म्हणजे क्षणात ऊन तर क्षणात सावली होणं, श्रावण असणं म्हणजे लेकराच्या सुखासाठी अंतर्बाह्य हिरवंगार होणं, आतून उमलून येऊन आशेचा झरा झुळझुळता ठेवणं हे सारं सारं आईच्या श्रावण असण्यात अनुस्यूत असतं. गावातल्या साऱ्या स्त्रिया पूजेसाठी देवळात जात असताना या माऊलीनं मात्र लेकराला जवळ घेऊन त्याच्या पाटीवर स्वस्तिक काढून दिलं. शाळेत शिकतानाही आईचा मायेचा अदृश्य हात कवीला खिडकीतून आत येताना दिसतो. मुलाला वास्तवाचं ऊन लागू नये म्हणून आई स्वतःच घराचे छप्पर होते. लेकराचा चेहरा हेच तिच्या जगाचं वर्तमानपत्र असतं. आईनं कविता शिकवल्यामुळे जगण्याचं गणित चुकलं तरी भय वाटलं नाही. अशा आईच्या लेकरावर मायेची, ज्ञानाची, शहाणपणाची पाखर धरणाऱ्या अनेक क्षणांच्या कविता या संग्रहात भेटतात. लेकराच्या लेखी आई सर्वज्ञ असते; कारण त्याच्या आयुष्याचं ती सारंच जाणत असते.

*'आईला उमगते सारे*
*उन्हात कोण उभे आहे ?*
*आईला उमगत जाते*
*जमिनीला ओल कुठून येते ?*
*****
*जन्मभर उन्हात नांदायची*
*तिला सवय असते...'*

स्वतः उन्हात नांदून लेकरांवर सावली धरणं हेच तर माऊलीच्या जगण्याचं ध्येय असतं. पाखरांच्या स्वप्नांची पायवाट ती स्वतः जन्मभर शोधत असते; आणि मुलालाही 'चालत राहा' हा मंत्र देते. वडलांच्या माघारी आई आणि वडीलही तीच होते. शेवते म्हणतात-

*'आईने वडिलांचे मरण जाणवूच दिले नाही*
*आईने वडिलांचे रूप कधी घेतले*
*कळलेच नाही.'*

हे सगळं संचित पणाला लावून लेकराच्या पाठीमागे जगण्याचं बळ आई निर्माण करते. त्याचं कवी असणं तिला अत्यंत प्रिय. त्याच्यासाठी, त्याच्या कवितेसाठी ती पंढरीचा वृक्षा शोधते.

*'आईच्या*
*एका हुंकारात*
*कवितेचा जन्म होतो.'*

हा विश्वास कवीला कवी असण्याचं आणि जगण्याचंही बळ पुरवतो. ही शिदोरी त्याला आई नसतानाही पुरणार असते.

असं असलं तरीही आईचा मृत्यू हा कवीच्या मनाला पटण्यापलिकडचा अनुभव असतो. आईच्या देहाचं मरण त्याला समजू शकतं. पण तरीही तिचा मृत्यू, तिचं त्याला सोडून जाणं तो स्वीकारू शकत नाही. "आई कधीच मरत नाही, घर सोडून ती जाणार कुठे ! ती दिसणार नाही; पण घरभर फिरत असते." असा एक विश्वास आईच्या मृत्युनंतरही त्याला संजीवक प्रेरणा देत राहतो. कवितांमधून तर आईची पावले सगळीकडेच उमटत असल्याचा अनुभव वाचकही घेत राहतात.

अरुण शेवते यांच्या या आत्यंतिक उत्कट, तरल तरीही प्रगल्भ समजुतीचं दर्शन घडवणाऱ्या दोन्ही काव्याविष्कारांनी वाचकांच्या साहित्यिक समृद्धीत भर टाकली आहे. इतर कोणत्याही कवींच्या कवितेची, शैलीची, भाषेची, प्रतिमासृष्टीची सावलीही न पडता स्वतःची अशी एक पायवाट चोखाळणारी ही कविता कुठल्याही इझमच्या आहारी न जाता निखळपणाचा कलात्मक आनंद देते. स्वतःची अस्सल अनुभूती स्वतःच्या अस्सल भाषेत व्यक्त करण्याचा एक विरळपणाचा आनंदही या कविता वाचून मिळतो आणि एकसाचेपण, एक चेहरेपण आलेल्या आजच्या मराठी कवितेला, आधुनिकोत्तरतेचा एकच एक कृत्रिम चेहरा लाभलेल्या मराठी कवितेला अजूनही एक वेगळा अस्सल चेहरा असल्याचा आनंद या कविता वाचून मिळतो.

या दोन्ही संग्रहांच्या उत्तम निर्मितीमूल्यांमध्ये भर घालणारी मुखपृष्ठे आणि अर्थवाही, उच्च कलामूल्ये असणारी प्रख्यात कवी गुल्जार यांची रेखाचित्रे हे या दोन्ही पुस्कांचे मानबिंदू आहेत.

❖❖❖

**अंजली कुलकर्णी**
३, विघ्नहर, जयवर्धमान सोसा., बिबवेवाडी रस्ता,
पुणे ४११ ०३७. प्रमणभाष : ९९२२०७२१५८

'कवितेच्या कविता' पृष्ठे ६७, मूल्य रु. ७०/-,
'आईच्या कविता' पृष्ठे ६८, मूल्य रु. ७०/-, अरुण शेवते, ग्रंथाली.

# कीर्तन परंपरेतील एक उत्स्फूर्त आविष्कार– संत गाडगेबाबांचे लोककीर्तन !

- डॉ. सौ. रजनी लुंगसे

*[ भजन आणि कीर्तनपरंपरेचे 'संतपीठ' आजही लोकमानसात टिकून आहे. गाडगेबाबांनी त्याला लोक–कीर्तनाच्या दर्जाला नेऊन कीर्तनपरंपरेचा परीघ विस्तीर्ण केला. –संपादक]*

एकविसाव्या शतकाच्या विकासात्मक वाटचालीकडे धावत असता बहुतेकांच्या मनात शंकेची पाल चुकचुकते की या संगणकीय युगात संतांचे साहित्य टिकेल का ? संतांचे विचार लोक आत्मसात करू शकतील का ? पण अशा प्रश्नांनाही समाजातून उत्तरेही लवकरच मिळतात व शंका निरसन होते. विज्ञानाच्या सहाय्याने दैदिप्यमान प्रगतीचा आराखडा अभ्यासता स्पष्ट दिसते की अध्यात्मिकतेची बैठक संत साहित्याने रुजविल्यामुळे माणसांमध्ये माणुसकीचा धर्म रुजविण्याचे प्रयत्नही होत गेले. मंदिराचे बांधकाम तुम्ही कितीही आधुनिक पद्धतीने करा. मूर्तीही संगमरवरी किंवा कोणत्याही धातूची करा परंतु त्यावर वाहणारे पान-फूल मात्र निसर्गातीलच वाहिले जातात. तसेच मनातील श्रद्धापूर्ण भाव तर विकत घेता येत नाही. हे कोणत्याही काळी कोणत्याही शतकात न बदलणारे सत्य आहे. हेच उदाहरण नजरेसमोर ठेवले तर संत साहित्यही टिकेल व त्याची गरजही जाणवतच राहील. कारण विज्ञानाने माणूस जगविला तर संतांनी माणसातील माणुसकी जागविली हे विशेष होय. मानवधर्म रुजविण्यासाठी संत प्रयत्नशील राहिले. त्यांतील काही स्वतःला संत म्हणवून घेणारे, ढोंगी, स्वार्थी, संधीसाधू यांना अपवादात्मक म्हणून बाजूला टाकावेच लागेल. त्यासाठी सर्व संतांवर एकच शिक्कामोर्तब करता येणार नाही.

संत गाडगेबाबांची ओळख तर ग्रामस्वच्छता अभियानातून सर्वांना झालेलीच आहे. त्यांनी केलेल्या समाजकार्यातून सांस्कृतिकतेचा, वैचारिकतेचा वारसा जपला गेला. गाडगेबाबांच्या काळात व्यवस्थेला नकार देणे आणि समताधिष्ठित मूल्ये रुजवून समाजपरिवर्तन करणे हे अशक्यप्राय होते. तरीही भटकंती करून लोकभाषेचा वापर करून कीर्तनातून त्यांनी प्रबोधनाचे कार्य अगदी सहजपणे केले. समाजामध्ये एकीकडे अत्यंत दुःखी, दरिद्री, असहाय्य, गरजू, कष्टाळू, अज्ञानी लोक होते. त्याबरोबर अत्यंत सुखी, गर्भश्रीमंत आरामात जगणारे आणि ज्ञानीजनही होते. परंतु कोणीही कुणासाठी जगणे जाणत नव्हते. प्रत्येकजण स्वतःसाठी जगत होता. स्वयंकेंद्रीत वृत्ती फोफावली होती. गाडगेबाबांनी स्वतःच्या वागण्यातून दुसऱ्यांसाठी जगावे कसे याचे प्रत्यक्ष उदाहरणच घालून दिले. काही सुधारणा करायच्या असतील तर आम्ही एकटे आहोत, आमच्याकडे आर्थिकबळ नाही असे वाटणारेही अनेक आहेत. गाडगेबाबाही एकटेच निघाले होते. कुणाचीही साथ नाही. जवळ काहीही नाही. होते ते फक्त एक गाडगे व मनात होती प्रचंड इच्छाशक्ती ! यांच्या बळावर त्यांचा डेबूजी ते संत गाडगेबाबा हा प्रवास सुरू होता.

कीर्तनपरंपरेनुसार नारदीय कीर्तन, वारकरी कीर्तन आणि रामदासी कीर्तन यातून पुढील राष्ट्रीय कीर्तनांची परंपरा आजपर्यंत टिकून राहिलेली दिसते. संत गाडगेबाबांचे कीर्तन मात्र या पठडीत बसणारे दिसत नाही. त्यांच्या कीर्तनशैलीची धाटणीच वेगळ्या पद्धतीची होती.

भारतीय संस्कृतीत कीर्तनाला वेदकाळापासून असलेले महत्त्व आजच्या काळातही टिकून आहे. कीर्तनपरंपरेतील प्राचीन काळापासून सुरू असलेले विशिष्ट संकेत आजही पाळले जातात. त्यामध्ये कीर्तनाची जागा वेळ, काळ, कीर्तनकार श्रोता, कीर्तनकाराचा पोषाख, नमन, कीर्तनाचा पूर्वरंग व उत्तररंग, कीर्तनाचे सादरीकरण याबाबतीत संकेत असतात. कीर्तनाच्या जागेचेही संकेत पाळले जायचे पण आज ह्यामध्ये थोडेफार बदल झालेले आढळतात. परंतु गाडगेबाबांच्या कीर्तनात ह्या प्रकारचे कुठलेही



अनुक्रमणिका

संकेत पाळले जात नाहीत. किंवा वाद्याविषयी कुठलीही औपचारिकपणा आढळत नाही. मात्र एक महत्त्वाचा उल्लेख करावा लागेल; की समाजातील लोकांच्या समस्या ओळखून त्यावर मार्गदर्शन असायचे. अशिक्षितांपासून, सुशिक्षितांपर्यंत, अभ्यासक, समीक्षक, पत्रकार, विद्वान पंडित, संत, सावकार, व्यापारी सर्वांच्या अंतःकरणापर्यंत भिडणारी बाबांची बोलीभाषा हीच खूप प्रभावी होती. अगदी कौटुंबिक स्तरापर्यंत नाट्यांमधील व्यवहाराची आणि बांधिलकीची नाडही बाबांना अचूक सापडली होती. गाडगेबाबांच्या या कीर्तनामागील इतिहासाची पूर्वपिठिका जाणून घेतली तर त्यांच्या कीर्तनाची सुरुवात भजनांमधून झालेली दिसते. त्यांच्या आई, मामी दळण दळताना ऐकलेली भजने ओव्या डेबूजीच्या पाठ झाल्या होत्या. मामींनी पाठांतराचे कौतुक केले परंतु आई रागावली. तू पुरुष असून जात्यावरच्या ओव्या म्हणतो तू भजनीमंडळीमध्ये जा. झाले ते चांगलेच. डेबू भजनीमंडळामध्ये गेला. त्याच्या वाणीवर, मनावर भक्तीचे संस्कार झाले. संत ज्ञानोबा, तुकोबा, कबीराची वाणी मुखोद्‌गत झाली. त्याचाच उपयोग कीर्तनातून दाखले देताना झाला.

गृहत्यागानंतर डेबूजींनी प्रथम स्वतःच्या 'मी'पणाला संपविले. मी कोण ? कुठून आलो ? नाव-गाव काहीही नाही. जात-संप्रदाय, नाते-गोते काही नाही. एवढेच नाही तर भूक, तहान, झोप, काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मत्सर यांची पर्वा केली नाही. गाडगेबाबा मुद्‌गलेश्वराच्या यात्रेला सुरुवातीपासून जात असत. त्यांचे पहिले कीर्तन ऋणमोचनलाच झाले. या पहिल्याच कीर्तनात ते लोकांना म्हणाले, ''काययले आले तुमी या रिनमोचनाले ? भदांड घ्यायले ? पांघरुन घ्यायले ? ह्या तमाशाईच्या तंबूत जायले ? रिनमोचनच कायले निवडले हे कऱ्याले ? देवाचं-ठिकाण बाटवाले? बाप हो ! रिनमोचनाचा अर्थ काय ? कर्जातून मोकळं होनं ! ज्यानं जलम दिला त्याच रीन ! समाजानं वाढोलं त्याचं रीनं !

या रीनातून पार पाडण्यासाठी अर्थी येयाच, सेवा केल्यानंच रीन फिटते. सेवा करा देवाची, मायबापाची, समाजाची सेवा करा, तुमी करता फक्त आपली सोताची सेवा, आन् देवाले मागता सुख.''

गाडगेबाबांच्या या पहिल्याच कीर्तनातून त्यांच्या विचारांची दिशा स्पष्ट कळते. वैचारिक प्रगल्भता कळते . त्याकाळात सावकारी प्रथेची पाळे-मुळे खोलवर रुजलेली होती. गरिबांना जगणेही कठीण होते. तरीही लोक गरजेपोटी सावकाराकडे शेत, राहते घर, दागिने, बैल-जोडी गहाण ठेवून कर्ज काढत. सण, लग्न-समारंभ, यात्रा करीत. तीर्थयात्रांना जाऊन पुण्यप्राप्ती करणे. मुक्ती मिळविणे. देवाची प्राप्ती करणे हा उद्देश होता. परंतु तीर्थयात्रांना जाऊन देव मिळत नाही. मानवसेवा हीच ईश्वरसेवा आहे हे तत्त्व बाबांनी कीर्तनातून लोकांमध्ये रुजविले. समाजऋण, मातृ-पितृऋणातून कसे मुक्त व्हायचे ते सांगितले. बाबांच्या कीर्तनातून येणारे विषय आपल्या दैनंदिन जीवनातीलच आहेत. याविषयीची जाणीव झाल्यामुळे कीर्तनाला गर्दी वाढू लागली. पिढ्यान्‌पिढ्या असे कोणत्याही कीर्तनकाराने सांगितले नव्हते.

बाबा कीर्तनातून कष्टकरी लोकांचे उदाहरण देत. कपाशी वेचणाऱ्या गरीब कष्टकरी महिला लहान मुलांना पाठीशी बांधून काम करतात; परंतु मालक त्याची पर्वा न करता गरीबांना फसवितात. असे करू नका. ते पाप तुमच्या माथी बसेल त्यांना लुबाडून तुम्ही पंढरपूरच्या यात्रेचे पुण्य घेऊ नका.

बाबांनी रोजंदारीतील फसवेगिरी लोकांच्या लक्षात आणून दिली. त्यांना न्याय मिळावा म्हणून उपदेश केला. बाबांनी कीर्तनातून सत्याचा मार्ग दाखविला. दुःखी, आपद्‌ग्रस्त लोकांना बाबांचे कीर्तन म्हणजे आधार वाटू लागला.

**गाडगेबाबांच्या कीर्तनाचा प्रसार -**

गाडगेबाबांना समाजातील सर्व स्तरातील लोकांच्या वृत्ती-प्रवृत्तींचा चांगलाच परिचय झाला होता. मजुरांचे जीवन जगणारी, उन्हापावसात कष्ट करणारी तसेच गाद्यागिर्द्यांवर लोळणारी, कष्टकऱ्यांच्या सुखावर पुरणपोळी खाणारी माणसे पाहिली होती. त्याचबरोबर आपल्या दातृत्त्वशीलतेने दुसऱ्यांचे जीवन फुलवणारी, रडणाऱ्यांचे अश्रू पुसणारीही मंडळी समाजामध्ये होती. बाबांनी या सर्व वृत्तींचा अचूक वेध घेतला होता. त्यासाठी त्यांनी हाती घेतलेला खराटा त्यांना खूप

उपयोगी पडला. गावागावातून, गल्लीबोळातून, यात्रेकरूंच्या गर्दीतून हा खराटा त्यांना माणसांच्या व्यथा-वेदना व सुखाची ओळख करून देत होता. त्यामुळे बाबांना माणसे वाचता आली. गरजूंचे अश्रू पुसता आले. बाबांच्या काळात अनेक नामवंत कीर्तनकार होते; परंतु बाबांएवढे अचूक निरीक्षणशक्तीचा वापर करून समाजपरिवर्तन करू पाहणारे बाबाच होते. गाडगेबाबा वेगळ्याच पठडीतले कीर्तनकार आहेत हे लोकांनी ओळखले होते. त्यांच्या कीर्तनातील उपदेश, समाजहिताची तळमळ काही वेगळीच होती. हा कीर्तनकार शब्दांचा खेळ करणारा नसून प्रत्यक्ष कार्य करणारा महात्मा आहे. याला पैसा व प्रसिद्धीचा मोह नाही. हे लोकांना समजले होते. त्यामुळे गाडगेबाबांच्या कीर्तनाला माणसांचा महापूर येत असे असे सकृतदर्शी सांगतात.

गाडगेबाबांनी कीर्तनासाठी भ्रमंती करताना भुकेलेल्यांना अन्न, उघड्या नागड्याला वस्त्र, गरीब मुलांच्या शिक्षणासाठी मदत, रोगींना औषधोपचार, अपंग-महारोग्यांची सेवाही बाबांनी केली. वऱ्हाड, नागपूर, छत्तीसगड, दक्षिण महाराष्ट्र, कोकण, गोवा (पणजी), गोकर्ण, महाबळेश्वर, हुबळी, धारवाड, बेळगाव, कोल्हापूर, निजामचे राज्य, म्हैसूर संस्थान, बडोदा, इंदौर, धार, देवास दक्षिणेकडील सर्व संस्थाने यातील लहान-मोठ्या गावी बाबांनी कीर्तनं केली. तसेच उत्तरभारत, बिहार, म. प्रदेश, कर्नाटक, गुजरात, दक्षिण भारत- यावरून स्पष्ट होते की भारताच्या बहुतांश भागापर्यंत बाबा पोहचले होते. सुमारे पाच हजार ठिकाणी त्यांची कीर्तने झाली. कीर्तनासाठी रेल्वे, मोटार, आगबोट, बैलगाडी आणि पायीसुद्धा ! असा नऊ लाखांचा प्रवास बाबांनी केला. प्रवासात खूप हालही झाले परंतु समाजासाठी बाबांनी हे सर्व सहन केले.

भारताच्या वेगवेगळ्या प्रांतात कीर्तनकार होते; परंतु वेद-उपनिषदे, स्वर्ग-मोक्ष-मुक्तीची भाषाच सांगणारे ते होते त्यांचे संस्कृतप्रचुर शब्द पांडित्यांचा ठसा उमटवित होते. याउलट गाडगेबाबांचे कीर्तन सामाजिक परिस्थिती, काळ-वेळाचे भान ठेवून समाजाला जागृत करणारे होते. नवस, मुक्या-प्राण्यांचे बलिदान, दगडाच्या देवाची पूजा, अंगारे-धुपारे, अज्ञान-व्यसन, आळशीपणा याविषयी बोध देणारे होते. नरदेहाचे महत्त्व पटवून देणारे होते. नामस्मरण जीवनामध्ये रुजविणारे होते.

जिभले तुले काय धंदाऽऽऽ।
घडीभर भजावे गोविंदाऽऽऽ।

क्षणभर का होईना देवाचे नामस्मरण किती महत्त्वाचे ठरते. जीभेने वायफळ बोलण्यापेक्षा परमेश्वराचे नामस्मरण करावे. या नरदेहाला सार्थकी लावायचे असेल तर गोविंदाचे नाव मुखामध्ये ठेवा व हातामध्ये सत्कार्याचा गुण येऊ द्या तरच मानवी जन्माचे सार्थक होईल.

संत कबीरांच्या वाणीचा उल्लेख करून बाबा सांगत-
''पशू की होत पन्हैया, नर का कछु न होए ।
नर करनी करे तो, नर का नारायण होय ॥''

पशूचेही हाड, मांस सर्व काही उपयोगाला येते; परंतु माणसाचा आत्मा निघून गेला, की शरीर नश्वर होते. यासाठी कर्म करा. नराचा नारायण होण्याचा श्रेष्ठ व

## उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीस पुरस्कार

१ जानेवारी २०१० ते ३१ डिसेंबर २०१० या कालावधीत प्रकाशित झालेल्या पुस्तकांना उत्कृष्ट पुस्तकनिर्मितीचा पुरस्कार प्रकाशकांना देण्यात येणार आहे. त्यासाठी पुस्तके पाठवावीत, अशी विनंती आहे.

सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे यांनी व्यवस्थापिका (कै.) सौ. पुष्पा पुसाळकर यांच्या स्मरणार्थ- दिलेल्या एक लक्ष रुपये देणगीच्या व्याजातून रु. ५०००/- (पाच हजार) चा हा पुरस्कार दरवर्षी २४ मार्च रोजी त्यांच्या स्मृतिदिनी देण्यात येणार आहे.

**प्रमुख कार्यवाह**
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

अत्यंत सोपा मार्ग गाडगेबाबांनी सांगितला. बाबांचा हा कर्मसिद्धांत सामान्य माणसांपासून श्रेष्ठ, ज्ञानी, श्रीमंत लहान-थोर सर्वांसाठी उपयोगी होता.

बाबांचे 'कीर्तन' म्हणजे समाजप्रबोधनाची पाठशालाच होती. त्यांच्या कार्याचा पाया समाजनिरीक्षण व वैचारिकतेवर आधारलेला होता. समाजप्रबोधन हे खऱ्या अर्थाने मानसिक परिवर्तनावरच आधारलेले असते हे बाबांनी अचूक जाणले होते. बाबांनी उभे केलेले प्रचंड कार्य हे कार्यशक्ती, कार्यनिष्ठा, सत्यनिष्ठा, अंतःकरणातील तळमळ, पवित्रता, निरहंकारवृत्ती व समाजासाठी सर्वस्वाचा त्याग, या सर्वांच्या बळावर उभे होते. या अंतर्गत ऊर्जाशक्तीमुळेच ते कीर्तनातून समाजप्रबोधन करू शकले.

गाडगेबाबांच्या कीर्तनाचा आकृतीबंधही परंपरेची कास न धरता नव्या विचारप्रणालीचा बनला होता. नवी प्रेरणा लोकांपर्यंत पोहचविण्याचे कार्य त्यांच्या आशयामुळेच घडू शकले. त्याकाळात असे अनोखे धाडस एकाही कीर्तनकाराने केले नव्हते. बोलीभाषेतून त्यांच्याच वेदनांचा परिचय त्यांना करून देऊन हळूच त्यांच्या दुःखावर फुंकर घालण्याचे कार्य बाबांनी कीर्तनातून केले. हा क्रांतीकारक बदल बाबांच्या कीर्तनाचे वैशिष्ट्य ठरला.

बाबांनी कीर्तनातून देव-धर्माची माहिती दिली नाही. तसेच कोणत्याही धर्मपंथाला नावेही ठेवली नाही. फक्त प्रत्येक माणसाला स्वतःबद्दल विचार करायला लावले. आपण कोण आहोत ? कुठे आहोत ? आपण कसे जगत आहोत ? याविषयी विचार करायला लावले. आपल्या अंतरात्म्याला जागे करून त्याचा आवाज ऐकायला शिकविले. समाजातील गरजू, दुःखी, अनाथ, अपंगांची आर्त ऐकायला शिकविले.

गाडगेबाबांच्या कीर्तनाच्या रसरंगात अनेकजण न्हाऊन निघाले. त्यापैकी महाराष्ट्र रसिकांच्या हृदयात स्थान मिळविलेले साहित्यसम्राट आचार्य अत्रे गाडगेबाबांच्या कीर्तनासंदर्भात लिहितात,

''सिंहाला पहावे वनात, हत्तीला पहावे रानात तसे गाडगेबाबांना पहावे कीर्तनात, हजारो माणसांच्या प्रचंड समुदायात बाबा एकदा उभे राहिले म्हणजे पावसाळ्यातल्या मेघासारखे गडगडू लागतात; आणि डोक्यावर साहित्याचा सद्भावनेचा आणि सद्विचारांचा असा जोरदार मारा सुरू होतो की श्रोते अक्षरशः देहभान विसरतात. जन्मभर आमच्यासारखे भाषाप्रभू तोंड वासून त्यांच्याकडे बघत राहतात. जनतेची भाषा बोलणारा असा प्रभावी आणि जबरदस्त वक्ता महाराष्ट्रात दुसरा नाही. सर्व रसांची तुडुंब मेजवानी त्यांच्या भाषेत भरलेली आहे.''

बाबांच्या अचूक शाब्दिक माराचा आणि त्यांच्या सद्सद्विवेकबुद्धीचा सुंदर मेळ साधल्याची नोंद आचार्य अत्रे यांनी केली आहे.

डॉ. वि. य. कुलकर्णी यांनी गाडगेबाबांचे कीर्तन म्हणजे अनन्वय अलंकाराचे उदाहरण होते असे म्हटले आहे. तर गुणवंतराव चराटे यांनी ''बाबांचे कीर्तन म्हणजे मनोरंजनातून सुसंस्कार, लोकशिक्षण, लोकजागरण, लोकप्रबोधन होय.'' असा उल्लेख करून बाबांचे कीर्तन जणू समाजप्रबोधनाची पाठशाळाच होय या विचाराला पुष्टी दिली आहे.

बाबांच्या कीर्तनातील वक्तृत्व म्हणजे साहित्याच्या भाषेत शुद्ध रसपान होते. तर जीवनाच्या भाषेत अमृत होते. बाबांच्या कीर्तनशैलीत वक्तृत्व, नाट्य, अभिनय, संवाद, विनोद, संगीत यांची सहजस्फूर्त रेलचेल होती. कुठेही संस्कृतप्रचुरतेचा दिखावा नाही तर ती बोलीभाषेची मेजवानी होती. लोकभाषेतील दृष्टान्त, वाक्प्रचार आणि अनुभवातून जिवंत रसरसलेली वाणी होती. त्यांच्या विनोदी वृत्तीमध्ये शाब्दिक कोटीप्रचुरता, उपहास, उपरोध, विडंबन, व्याजोक्तीचा सढळ वापर होता परंतु व्याकरणाचा गंधही बाबांना नव्हता; हे विशेष होय. त्यांच्या कीर्तनातील मार्मिकता हृदयाला घरे न पाडता अत्यंत तळमळीने सुधारण्याची संधी देणारी होती. बाबांच्या कीर्तनात संवाद आणि नाट्याभिनय होता. संवादावर आधारित त्यांची कीर्तनशैली असल्यामुळे प्रश्नोत्तरे असायची त्यामुळे श्रोते मनापासून सहभागी होत. त्यासंदर्भात वसंत पोतदार लिहितात की ''बाबांचे कीर्तन कसबी अभिनेत्यासारखे एकपात्री असे, आवाजातले चढ-उतार, विभिन्न भावमुद्रा, नकला- गायन हे तर असायचेच पण घुमाऱ्यांचा प्रसंग रंगवताना ते मस्तपैकी

नाचत.''

अशिक्षित लोकांना त्यांच्या चुका लक्षात आणून नव्या बुद्धिवादी दृष्टीकडे सहजपणे वळविण्यासाठी बाबांचा हा नाट्याभिनय लोकशिक्षणाचे काम करत होता.

संत गाडगेबाबांच्या कीर्तनात वैज्ञानिकदृष्टी रुजविणारे दाखलेही आढळतात. उदाहरणार्थ- ''आजपर्यंत देव कोणालाही दिसला नाही. म्हणून दगडधोंड्यामध्ये देव असतो हे मान्य करू नका, तीर्थक्षेत्री असलेले पाणी तीर्थ नाही तर ते शुद्ध पाणीच आहे. पाण्यावर पोट भरण्याचा, पैसा कमविण्याचा धंदा आहे. ही फसवणूक आहे. देव मानायचा तर सूर्यनारायणाला माना. जो सर्वांना जीवन देतो. तो सूर्यनारायण विकत घ्या असे बाबांचे सांगणे दूरदृष्टीचेच प्रतीक नाही का ? याच विषयावर आज चर्चा करण्याची गरज निर्माण झाली आहे. सोलर ऊर्जा उपयोगात आणावी यासाठी आपण प्रयत्नशील आहोत.

नवसाने मूल होत नाही, आता शहाणे व्हा. डॉक्टरांकडे जा, उपचार करून घ्या.

माणसाचा मृत्यू झाला; की त्याच्या आत्म्याला शांती लाभावी म्हणून तीर्थक्षेत्री पिंड करण्याचा विधी केला जातो पण बाबांना ते आवडत नव्हतं. त्यापेक्षा जिवंत माणसाला पोटभर खाऊ घाला. त्याचे मन तृप्त करा. मृत्यू पावल्यावर त्याच्या नावाने अग्नीत अन्न टाकू नका.

असे कितीतरी दाखले बाबांनी कीर्तनातून दिले त्यामुळे विज्ञानयुगातही त्यांचे विचार महत्त्वाचे ठरले. त्यांच्या कीर्तनांनी सांस्कृतिकतेचा ठेवा जतन करून ठेवला पण त्याचबरोबर माणसाला माणूस म्हणून ओळखावे व जगू द्यावे हा अमूल्य संदेशही रुजविला.

❖❖❖

प्रा. डॉ. सौ. रजनी लुंगसे
विभाग प्रमुख
एस.पी.डी.एम. महाविद्यालय, शिरपूर
भ्रमणभाष : ९७६३२३६४२२

❖❖❖

## नवे आजीव सभासद

१) भिडे उदय विनायक (ठाणे)
२) ठाकुर अनिल वामन (मोघरपाडा)
३) आचार्य चारूता रवींद्र (पुणे)
४) माटे साधना, पुणे
५) पवार आदीनाथ हरिदास (पुणे)
६) शेंडग बाबासाहेब रावसोहब सांगली
७) कुलकर्णी संजय कल्याणराव सोलापूर
८) कुलकर्णी विलास विठ्ठल सोलापूर
९) गांधी राजेंद्र मोतीचंद, सोलापूर
१०) राख वैजिनाथ पांडुरंग, हर्जीपूर
११) कवडे यशवंत गणेश, पुणे
१२) पेंडसे सुजाता प्रमोद, कोल्हापूर
१३) पाचिंद्रे सुजाता गणपत, कोल्हापूर
१४) बापट माधव सदाशिव
१५) खेवुडकर अनिता अ., मिरज
१६) टिळक अविनाश, सांगली
१७) धुळगुळ भिमराव, मिरज
१८) बोरगाव धनदत्त, मिरज
१९) दातार रोहिणी धनंजय, पुणे
२०) जोशी गीतांजली अविनाश, पिंपळे सौदागर
२१) नलगे राजेश्वर शरणप्पा, सोलापूर
२२) मेहता अशोक शंकरलाल, सोलापूर
२३) मेदेर्गीकर महेश बाबुराव, सोलापूर
२४) कांबळे कमलाकर श्रीपाद, पुणे
२५) माने रवींद्र सदाशिव, पुणे
२६) आंबेकर श्रीकांत गणेश, पुणे
२७) कुलकर्णी सुनील प्रभाकर, सांगली
२८) नरवडे देविदास धोंडुजी, उल्हासनगर
२९) सोनवणे सुनील लाला, उल्हासनगर
३०) लाटकर विजय विठ्ठलराव, सातारा
३१) देशपांडे शरद मधुकर, पुणे
३२) वेंबडे रामरोज, चिखली
३३) कोळेकर किसन माणिक, आकुर्डी
३४) महामुनी रवींद्र रामचंद्र, निगडी
३५) जाधव अशोक रघुनाथ, चिखली
३६) मस्के विष्णू शाहू, चिंचवड
३७) शिरम औदुंबर चंद्रकांत, आकुर्डी
३८) नरुटे भारत गणपत, चिखली
३९) पाटील शशिकांत नारायण, भोसरी
४०) सोनकांबळे दयानंद नामदेव, निगडी
४१) होले सुनील दशरथ, चिंचवड
४२) मराठे दिलीप बाळकृष्ण, देहूरोड
४३) भूमकर ज्ञानेश्वर केशव, पिंपरी
४४) येलकर प्रविण लक्ष्मणराव, निगडी
४५) भिनगे धनंजय, निगडी
४६) भिनगे अनिल, निगडी
४७) मराठे प्रज्ञा प्रमोद, निगडी
४८) भस सुर्यकांत ज्ञानोबा, निगडी
४९) गारगोटे सुनील आनंदराव, निगडी
५०) बारसकर विद्या सुनील, निगडी
५१) बारसकर निरंजन सुनील, निगडी
५२) कोळकर रोहिणी किसन, आकुर्डी
५३) निकम नामदेव दादाराव, चिंचवड
५४) चव्हाण विलास सुकलाल, पुणे
५५) शिदोरे अनिल वामन, पुणे
५६) इंदलकर अशोक धर्माजी, पुणे
५७) वाळींबे अमृता गिरीश, पुणे

❖❖❖

# दलित साहित्याचा पुनर्विचार

- डॉ. शशिकांत लोखंडे

*[ दलित साहित्याच्या 'नकारा'त भविष्यकालीन मानव्याचा एक 'होकार' भरला आहे; अशी हे साहित्य वैचारिक ग्वाही देत असले तरी प्रत्यक्षात ते आत्मकेंद्रित आणि साचेबंद होत चालले आहे. त्यामुळे 'कलेचा आतला आवाज' आणि कलेच्या कसोटीपासून दूर जात आहे. या दृष्टीने दलित साहित्याचा पुनर्विचार व्हायला हवा–*

*संपादक ]*

अन्याय निवारण्याची वैचारिक बैठक दलित समाजात आंबेडकरप्रणीत शिकवणुकीने निश्चित झाली आहे. त्यामुळे दलित साहित्यात व्यथित जाणिवांना एक व्यापक सामाजिक अधिष्ठान मिळाले आहे. दलितांना 'चातुर्वर्ण्यव्यवस्था-विरोधी लढा' उभारण्याचे प्रशिक्षण डॉ. आंबेडकरांनी 'शिका, संघर्ष करा, संघटित व्हा.' ह्या आदेशात्म-संदेशातून दिले. "ज्या अदलित तरुणांना आजच्या यंत्रसंस्कृतीने 'रूटिनः जंतू' बनविले. त्याच यंत्रसंस्कृतीने गावकुसाबाहेर राहाणाऱ्या दलित समाजाला मुक्तीची नवी वाट दाखविली." त्यातून संवेद्य दलितमनात प्रतिक्रियात्म बंडखोरी, निषेधात्मसंतप्तता, नकारप्रचुर आक्रमकता, त्वेषपूर्ण अन्यायाचा तीव्र द्वेष निर्माण झाला, त्याचेच प्रतिबिंब दलित साहित्यात प्रतिक्रिया म्हणून उमटले आहे. रक्त, अश्रू, वक्तृत्व यांचा सूचक निर्देश करणारे दलितसाहित्य कलापातळीवर सर्जनशील होऊ शकलेले नाही.

साहित्याचे प्रचलित मानदंड दलित साहित्याला मांडायचे असतील तर दलित साहित्याने ह्या अशा मानदंडांचे अनुसरण करणे थांबविले पाहिजे. नवे साहित्यशास्त्र निर्माण/तयार करण्यापेक्षा जुन्या साहित्यशास्त्रात काही नवी परिमाणे समाविष्ट करणे महत्त्वाचे ठरेल.

दलित साहित्यात ठराविक आशयाचे ठराविक पद्धतीने पुनरावर्तन आजही आहे. गुणात्मदृष्ट्या दलित साहित्यात काही वेगळेपण आले असे म्हणता येत नाही. दलित साहित्यातील अनुभवाशय प्रक्षोभशील आणि बहुपरिणामक्षम आहे; पण तो दलित साहित्यात प्रत्ययकारीपणे उतरत नाही. "दलित साहित्याने बुद्ध्याच ज्या क्रांतिगर्भतेचे वाण स्वीकारले आहे ती क्रांतिगर्भता समूहमनाचा भाग बनण्यात ज्या चेतनात्मक घटकांचे, संचलन, संघटन, संघात व्हावयास पाहिजे तो या साहित्यात योग्य त्या प्रमाणात होत नाही. म्हणून संख्यादृष्ट्या 'द. सा.' विपुल आहे, पण गुणदृष्ट्या कमीच आहे." कारण दलित साहित्यातील क्रांतीविषयक कल्पना फार स्थूल व ठिसूळ आहेत. साहित्याच्या द्वारा क्रांतीला जी मदत होते ती 'प्रत्यक्ष' स्वरुपाची कधीच नसते; म्हणून दलित लेखक समाजक्रांतीदृष्ट्या प्रत्यक्ष कृतीशून्य आहे. मुळात दलित साहित्य समाजाभिमुख अधिक आहे म्हणून त्यातील 'अनुभव' प्रसरणशील, विश्वात्म, कालस्थलव्यक्तीनिरपेक्ष नाहीत. दलित साहित्यातील अनुभव व्यक्तीमनाचा नसून समूहमनाचा आहे. 'मी', 'माझे', पेक्षा 'आम्ही' 'आमचे' त्यात अधिक आहे. तेथे व्यक्तिमनाच्या अनुभवाची 'स्वायत्तता' नाही. दुःखाची विविधता, वैचित्र्यता असली तरी दुःख एकच आहे. दलित अनुभवांच्या आंतरिक संघटना विविधप्रकारे, विविध रुपात, विविध आकारात, विविध अंगांनी होणे शक्य केले पाहिजे; कारण दलित साहित्यातील आशयाचे सामुदायिक स्वरूप व आविष्काराचे प्रचलित तंत्र यांचा मेळ बसत नाही. "अव्वलदर्जाच्या समूहप्रेरित कलेत व्यक्तिविशिष्टतेचे अग्र आणि सामुहिक जाणिवेची घनता यांचा परस्पर समवायी तोल साधला जावा लागतो." हे असे दलित साहित्याबावत दिसत नाही.

आंबेडकरप्रणीत विचारांचा प्रभावात्म प्रसार हे येथे साध्य होऊन व्यक्ती-अनुभूतींचे निराळेपण साधन बनते. अनुभूतीच्या तीव्रतेपेक्षा 'विचार अवगुंठित' प्रसाराचा प्रभाव तीव्रतेने जाणवतो. उदा. बंधू माधवांच्या कथा. दलित साहित्याने साहित्य आणि प्रचार यातील सीमारेषा सांभाळलेली दिसत नाही. प्रचार हा व्यावहारिक, साधनात्म, उपयुक्त, कृतीशील, फलदायी, कालसापेक्ष, सामूहिक आहे. साहित्य हे प्रतिकात्मक, साध्यात्मक, अव्यवहारी, निरूपयोगी,

कृतीशून्य, निष्फलदायी समूहसहीत, कालनिरपेक्ष आहे. प्रचार हा एकांडेपण, सुसंस्कृत, सौहार्दिक आहे. व्यवहारिकप्रचार व व्रताचारी ध्येयवाद यात भेद आहे.

दलित साहित्यात 'सामूहिक'तेला, सामूहिकजाणिवेला महत्त्व आहे म्हणून लोककलांचा (folk art) आदर्श दलित साहित्याने घेतला पाहिजे. समूहात्मक जाणिवा आणि कलात्मकता यांचे साहचर्य म्हणून दलित नाटके कथा-कादंबरी-कविता-स्वकथने' अधिक हवीत तरच दलित साहित्याचा आंबेडकरी व्रताचारी ध्येयवाद सिद्ध होईल.

ज्याचा उल्लेख 'स्वकथने' केला जातो ती सुद्धा 'स्वकथने' नसून 'समूहकथने' (Biography of collectivism) आहेत. संतसाहित्यही 'समूहवादी' असल्याने त्याचा आदर्श दलित लेखकाने घेतला पाहिजे. तसेच आंबेडकरप्रणीत समूहवादी बौद्धपरंपराही दलित साहित्याने धारण केली पाहिजे.

डॉ. बावासाहेब आंबेडकरांनी भारतीय परंपरा ही 'परंपरा' म्हणून नाकारली नाही, त्यांनी परंपरेतील, परंपरेवरील मानवता व कल्याण-विकास विघातक शल्येच नाकारली आहेत. त्यांनी हिंदूधर्म नाकारला-जो मूळ सत्त्वशील परंपरेला मारक आहे आणि त्यांनी धर्मांतर केले पण 'धर्म' कल्पना मुळीच नाकारली नाही. कारण भारतीय परंपरा 'धर्म' मानते. त्यांनी एतद्देशीय ह्या मातीतील 'धम्म' (धर्म) स्वीकारला आणि भारतीय परंपरा नाकारली नाही. परंपरा सांगते, ''आई, वडील, गुरू हे पूज्य आहेत.'' हे कर्मठ ब्राह्मण, दलित, मार्क्सवादी, गरीब, क्रांतिकारक, गुन्हेगार कुणीकुणीही हे सांगणे नाकारणार नाही.

दलित साहित्याने उच्च, शुद्ध परंपरेचे जतन केले पाहिजे. बौद्ध परंपरा जपली पाहिजे. परंपरा ही जातिविहीन आहे. स्वार्थी, मतलबी, राजकारणी लोकांनी परंपरेला जातींच्या कोंडवाड्यात गुदमरवून टाकले; ही गोष्ट वेगळी आहे. भारतीय साहित्यातील, परंपरेतील Myths-पुराकथांचा ही दलितलेखकांनी होकारात्मदृष्ट्या शोध घेऊन अभ्यास केला पाहिजे. त्याबाबत टीका, उपरोध, उपहास, द्वेष, निषेध सोडून विचार केला पाहिजे. इतकेच नव्हे तर धम्म/धर्म परंपरेचे साहित्यातून अभिसरण होण्याला कोणकोणत्या घटकांची आवश्यकता असते, याचे भान दलित साहित्याने ठेवले पाहिजे.

तसे पहाता, केवळ बौद्ध तत्त्वज्ञान घेतले तरी बौद्धधर्मातील 'कारुण्यभाव', 'प्रज्ञाप्रवाद' हे दलित साहित्यात फारसे दिसत नाही. बौद्धधम्म संकल्पनेच्या आधारे पाश्चात्त्य लेखक हॉर्मन हेस यांनी 'सिद्धार्थ' सारखी यशस्वी कलाकृती निर्माण केली. टी. एस. इलियट यांनी waste land सारख्या दीर्घ काव्यरुपाने भारतीय संस्कृतीतील पारंपरिक संदर्भाचा स्वाभाविकरीत्या स्वीकार केला आहे.

कोणतीही 'कलाकृती' स्वसंचित घेऊनच जन्मते. स्वसंचित म्हणजे परंपरा. परंपरा म्हणजे केवळ सांकेतिकता, तर्करहितता, सांप्रदायिकता, पुनरूज्जीवनवाद नव्हे. परंपरा विचार म्हणजे जुन्याकाळात केवळपणे प्रविष्ट होते नव्हे; तर जुनी परंपरा नव्या संदर्भात प्रवाहित करणे होय. डॉ. बाबासाहेबांनी बुद्धधम्मातील 'करुणाविचार'च स्वीकारला व त्यातील 'शून्यवाद' बाजूलाच ठेवला. मूळ बुद्धधर्मातील आचार, विचार, उपचार-उपासना त्यांनी सांकेतिकपणे (Dogmatically) स्वीकरले नाहीत.

दलित साहित्याच्या नकारात भविष्यकालीन मानव्याचा एक महान होकारही भरलेला आहे, अशी हे साहित्य वैचारिक पातळीवरून ग्वाही देते. पण प्रत्यक्षात मात्र त्याची प्रचिती ह्या साहित्यातून येत नाही, कारण दलित लेखक बौद्धधर्म परंपरा जोमाने आत्मसात करू शकलेला नाही. त्यामुळे फुले-आंबेडकर-मार्क्स-शाहू यांचा ठळक उद्घोष वा त्यांच्या विचारांचा स्थूल गद्यपद्यात्म अनुवाद येथपर्यंतच दलित साहित्य थांबले आहे.

'सर्जनशीलता' ही बौद्धिकपातळीनिरपेक्ष असते. बौद्धिक पातळीवरून आंबेडकर प्रणालीशी प्रतिबद्ध असलेला लेखक चांगले सर्जनशील साहित्य सिद्ध करू शकणार नाही. ''कोणतीही तत्त्वप्रणाली केवळ बौद्धिक पातळीवरून स्वीकारल्याने, तिच्याशी 'प्रतिबद्धता' मानल्याने किंवा तिच्या घटापटात्मक चर्चेने चांगले सर्जनशील साहित्य सिद्ध होत नसते.'' ती 'प्रतिबद्धता' त्या लेखकाच्या जीवनजाणिवेचा सावयनी भाग बनली पाहिजे. या तत्त्वप्रणालीशी तादात्म होऊनही कलावंत या नात्याने ह्या तत्त्वप्रणालीकडे काहीशा तटस्थपणे



अनुक्रमणिका

पहाता आले पाहिजे. स्वतःचे कलात्म संवेदन अधिक सूक्ष्म, चोखंदळ कसे होईल याचीच त्याने चिंता वाहिली पाहिजे. तत्त्वचर्चेतून नव्हे तर संस्कारजन्य जाणिवांतून 'कलात्म-भान' आले पाहिजे.

समाजाभिमुख साहित्याने कलेशी सोयरिक केलीच पाहिजे. ''दलित साहित्याने कितीही मनात आणले तरी मराठी भाषेचा आणि पूर्वपरंपरेचा रक्तसंबंध डावलून मराठी भाषेतील साहित्याची मांडणी, मांडणी कोऱ्या पाटीवर करणे कठीण आहे, अनुभवही हेच सांगतो.''

परंपरा ही देश, काल, परिस्थिती सापेक्ष आहे. परंपरा म्हणजे विशिष्ट संघटना, व्यवस्था, पद्धती, आकृतीबंध, आशयविशेष दृष्टिकोण, चैतन्यस्त्रोत इ. इ. उदा. संकेत, रूढी, पंथ, प्रणाली संप्रदाय, विधिनिषेध, व्रतवैकल्ये, सण, उत्सव. ह्या अशा परंपरेमुळेच सामुहिक आणि व्यक्तिगत स्तरांवरील जीवन, दृष्टी, तत्त्वज्ञान, नीतिकल्पना, श्रेयप्रेमविषयक धारणा, अभिरूची विशेष व सौंदर्यसंवेदन 'नियत' (Exist) होते. समाजमनाचे संस्करण, संभारण, सांत्वन परंपराच करते. उदा. दलित समाजाला त्याची म्हणून काही एक परंपरा आहेच. परंपरा हा प्रकार श्रद्धेचे, भावशरणतेचे, अनुभूतीचे क्षेत्र आहे. पारंपारिक दलित समाज बौद्ध परंपरा त्यामुळेच स्वीकारत असावा. परंपरेशी प्रत्येकाचा जन्मापासून मृत्यूपर्यंत संवादाच्या, समन्वयाच्या, वा संघर्षाच्या रुपात कळत-नकळत सातत्याने संबंध येतोच. उन्नयनांप्रमाणे अवनयन करण्याची शक्तीही परंपरेत आहे. परंपरा भूतकालाधिष्ठित असली तरी तिचा प्रभाव वर्तमानावर असतो, आणि तिचे परिणाम भविष्यकाळावर होत असतात. परंपरेत जाणिवेप्रमाणे नेणिवेचेही घटक असतात म्हणून परंपरा भाषा, काव्य, साहित्य, लयतत्त्वे इत्यादींची हृदयरेषाच बनते. आविष्कार शैलीशी तिचा संबंध येतो.

परंपराविचार म्हणजे पुनरूज्जीवन, रूढीपालन, जुन्या काळात जगणे नव्हे तर जुन्या परंपरेचा चैतन्यप्रेरक स्त्रोत नव्याच्या संदर्भात प्रवाहित करणे. सत्त्व देणे. हे तिचे कार्य आहे. परंपरेचा आधार घेऊनच माणूस स्वतःचे, स्वसमाजाचे, संभरण करतो, प्रगती करून घेतो. कालानुरुपरीत्या परंपरेतील विचित्र, विसंगत, जरठ भाग गळून पडतो. संदर्भान्वये नवे उन्मेष येतात. जुन्या खोडाला नवी पालवी येते. काही घटकांचे विसर्जन होते. काहींचे पुनःजनन वा नवसंघटन. 'मिथ'चा विचार हा एकप्रकारे परिपक्व असा औचित्ययुक्त परंपराविचारच असतो.

ऐतिहासिक संशोधन आणि myths ची कलात्म परिमाणे यांचाही गोंधळ दलित लेखक/विचारवंत करतात. भारतीय पुराणकथांच्या संदर्भात चुकीची रणे माजवितात व मूर्तिभंजनावरच केवळ भर देतात. डॉ. आंबेडकरांनी परंपरेविरूद्ध प्रखर बंड केले. विद्रोह केला. पण हे करताना त्यांनी पूर्वपरंपरेतील मूलात्म स्वरूपाच्या चैतन्य द्रव्याला सर्जनशीलपणे स्पर्श केला म्हणूनच इथल्या मातीतला 'बुद्धधम्म' त्यांनी स्वीकारला. ते केवळ मूर्तिभंजक नाहीत. तर मूर्तीसर्जक आहेत. यामागे त्यांचे चैतन्यप्रेरक नैतिक प्रेरणेचे तात्त्विक अधिष्ठान आहे. ''परंपराविद्रोह हा एक प्रकारे दुसऱ्या पातळीवरून केलेला परंपरा स्वीकाराचा गंभीर विधी होय.'' स्थितीशील घटकांचा त्याग म्हणजे परंपराविद्रोह होय. श्री चक्रधर स्वामी, बसवेश्वर, बुद्ध, ज्ञानेश्वर, केशवसुत, मर्ढेकर, फुले, तुकाराम, आंबेडकर यांनी हेच केले.

केशवसुत म्हणतात :

'जुन्यातून जी निष्पत्ती नवी ।
काय नव्हे ती श्रेयस्कर ?'

मर्ढेकरांनी रविकिरण मंडळाची परंपरा नाकारली; पण कविता निर्मितीसाठी बालकवींचा मागोवा घेतला. विद्रोही नामदेव ढसाळ नवकवींच्या शैलीचे अनुकरण करतो. दलितकवी यशवंत मनोहर यांची कविता संस्कृतप्रवण असून तीवर कुसुमाग्रजांच्या अग्नीसंप्रदायाची छाप आहे. दलित साहित्य हे तर भाषा व रचनातंत्रदृष्ट्या परंपरावादीच असून, नव साहित्याच्या प्रभावाखाली अद्याप आहे.

❖❖❖

**शशिकांत लोखंडे**
प्र-पाठक
पदव्युत्तर मराठी विभाग,
एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठ,
ठाकरसी रोड, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
दूरध्वनी : ०२५०-६५२५९४१ भ्रमणभाष :
९८२०६५२६१२, ०२२२२०३१८७९ एक्सटेन्शन - ३०४



अनुक्रमणिका

# नॉर्वेजियन नाटककार हेन्रिक इब्सेन

वसंत बागुल

*[ नाट्यसृष्टीला सामाजिकतेचे भान देणारा नाटककार– हेन्रिक इब्सेनचे नाव घेतल्याशिवाय मराठी नाट्याची चर्चा होऊ शकत नाही. मराठी नाट्यलेखनावर त्यांचा प्रभाव सुपरिचित आहे. त्यांच्या जीवनचरित्राचा घेतलेला हा एक आढावा, उद्‌बोधक ठरावा. – संपादक]*

हेन्‌रिक्‌ जॉन इब्सेन (HENRIK JOHAN IBSEN) चा जन्म २० मार्च १८२८ मध्ये नॉर्वेच्या पूर्व किनाऱ्यावर आणि Christiania (आत्ताचे Oslo) या राजधानीच्या दक्षिणेला शंभर मैलावर वसलेल्या Skien ह्या लहानशा व्यापारी गावी झाला. Knud Plesner Ibsen हा व्यापारी आणि त्याची पत्नी Marchen, nee Altenburg यांचे तो दुसरे अपत्य होता.

इब्सेन हे डॅनिश नाव आहे. ( Ib हे Jacob चे जुने डॅनिश रूप), तो जन्माने जरी नॉर्वेजियन होता तरी त्याच्या पूर्वजांच्या अंगात डॅनिश, जर्मन आणि स्कॉटिश रक्त खेळत होते.

इब्सेनचा आजोबा Henrich Petersen Ibsen हा प्रांजळ मनाचा; उत्साही आणि विनोदी स्वभावाचा होता. त्याला दोन मुले झाली, पहिला Jacob von der Lippe Ibsen व दुसरा Knud Plesner Ibsen. यापैकी पहिला १८०५ मध्ये मृत्यू पावला. Knud Plesner Ibsen च्या आईने पतीच्या मृत्यूनंतर दुसरा विवाह केला. तिला झालेल्या मुलांबरोबर म्हणजे आठ सावत्र भावंडांबरोबर त्यालाअ आपले बालपण घालवावे लागले.

१ डिसेंबर १८२५ ह्या दिवशी वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी Knud Plesner Ibsen चा विवाह झाला. त्याच्या पत्नीचे नाव Marichen Cornelia Martine Altenburg होते. तिच्या अंगातही नॉर्वेजियन प्रमाणेच डॅनिश व जर्मन रक्त होते. ३ ऑक्टोबर १८२६ ह्यादिवशी त्यांना पहिला मुलगा झाला. हा मुलगा Johan Altenburg Ibsen फक्त दीडच वर्षे जगला. ह्या दुःखद घटनेच्या २६ दिवसापूर्वीच म्हणजे २० मार्च १८२८ ह्या दिवशी इब्सेनचा जन्म झाला होता. त्याचे नाव त्यांनी Henrik Johan ठेवले. पुढील सात वर्षांच्या काळात त्यांना Johan Andreas Altenburg, Hedvig Cathrine, Nicolai Alexander आणि Ole Paus ही चार अपत्ये झाली. यात Henrik Ibsen सर्वांत मोठा होता.

Skien येथील मुख्य चौकात असलेल्या Stockmannagarden नावाच्या घरात इब्सेनचा जन्म झाला. १८८१ मध्ये लिहिलेल्या आत्मचरित्राच्या टिपणातील एका भागात तो म्हणतो, 'ज्याला नंतर Stockmann's house हे नाव दिले गेले त्या, बाजारपेठेत असलेल्या, घरात माझा जन्म झाला. उभट पायऱ्या, आणि भव्य व उंच मनोरे असलेल्या चर्चच्या उजव्या बाजूस शहरातील मानखोडा आणि डाव्या बाजूस एक तुरुंग व एक वेड्यांचे इस्पितळ असलेला टाऊन हॉल होता. या बाजारपेठेच्या चौथ्या बाजूस एक लॅटीन भाषेची व एक सामान्य शाळा उभारलेली होती. मध्यभागी चर्च विमुक्त उभे होते. माझ्या दृष्टीला विश्वाचे पहिले दर्शन घडविणारे हे दृश्य होते. सर्वत्र इमारती; ना हिरवळ ना विस्तीर्ण प्रदेश. पण सबंध दिवसभर लाकडांच्या आणि पाषाणांच्या ह्या काटकोनी आकाशातील वातावरण Lonng Falls आणि Cloister Falls व इतर अनेक प्रपातांच्या अविरत घनगर्जनेने दुमदुमलेले असे. आणि प्रपातांच्या गर्जनांना भेदून जाणारे, किंकाळ्या, विलाप आणि आक्रोश हे स्त्रियांचे रुदनसदृश्य आवाज प्रातःकाळापासून ते रात्रीपर्यंत ऐकू येत असत. ते आवाज प्रपातांजवळील अविरत फिरत असलेल्यया शेकडो करवतींच्या पात्यांचे

आवाज असत १. शिएन हे त्याकाळी दोन हजार लोकवस्तीचे शहर व एक छोटेखानी बंदर होते. ठेल्मार्क परगण्यातील इमारती लाकडाच्या व्यापाराचे ते मुख्य व मध्यवर्ती केंद्र होते.

शिएन येथील लोक अहंमन्य व ताठरवृत्तीचे होते. परकियांशी त्यांचे वागणे चित्तवृत्तीच्या आहारी जाण्यात ते साशंक असत. ह्या त्यांच्या स्पष्ट सहजस्फूर्ततेच्या अभावाला इब्सेन 'आत्मिक भीरूता' म्हणत असे.

नॉर्वेला ४५० वर्षांपर्यंत खरे स्वातंत्र्य ठाऊक नव्हते. १३८७ मध्ये तो डॅनिश अंमलाखाली आला. लागलीच संघटना उभारून स्वातंत्र्याचा हक्क प्रदर्शित करण्याचे प्रयत्न नॉर्वेने केले. पण नेपोलियन विरूद्ध लढा देण्यात पाठिंबा दर्शविल्याबद्दल इंग्लंड आणि रशियाकडून नेतृत्व केल्या गेलेल्या बलाढ्य शक्तींकडून तो स्विडनला पारितोषिक म्हणून बहाल करण्यात आला. नॉर्वेजियनांनी मग आपल्या स्वातंत्र्यरक्षणासाठी शस्त्रे उपसली, परंतु नुकताच Carl XIV Johan म्हणून स्विडीश राजा बनलेला नेपोलियनचा माजी अधिकारी Bernadotte ह्याने एका लहानशा मोहिमेत त्यांचा पराभव केला. एका दुसऱ्याच संघटनेत त्यांना जबरदस्ती शिरविले. त्यांची घटना चालू ठेवायची अनिश्चित अशी परवानगी त्याने त्यांना दिली. मात्र तरीही नॉर्वेजियन पार्लमेंटच्या (Storthing) ठरावावरील पूर्ण नकाराधिकार त्यांना मिळू दिला नाही. नॉर्वेने फक्त आपल्या मानेवरचे डॅनिश जू बदलून स्विडीश जू खांद्यावर घेतले आहे. राजकीयदृष्ट्या जरी तो स्विडनचा एक प्रांत होता तरी सांस्कृतिकदृष्ट्या तो डेन्मार्कचाच प्रांत राहिला. त्याचे नागरिक डॅनिश कादंबऱ्या वाचीत, किंवा इंग्रजी आणि फ्रेंच पासून झालेली भाषांतरे वाचीत. जरी देशी बोलीच्या भाषिक वैशिष्ट्याची समृद्धी आणि स्वाभाविक लयबद्धता यांच्या वापरासाठी चळवळ सुरू होती तरी नॉर्वेजियन लेखी भाषा riksmal ही वस्तुतः लेखी- डॅनिशपासून अभिन्नच होती. अर्ध्या शतकापर्यंत आयर्लंडमध्ये असलेल्या परिस्थिती सारखीच नॉर्वेतील राजकीय आणि भाषिक परिस्थिती होती.

तथापि वाङ्मयाच्या बाबतीत आयर्लंडपेक्षा नॉर्वेतील परिस्थिती भिन्न होती. नॉर्वेजवळ अभिमानास्पद असे वाङ्मय नव्हतेच. अठराव्या शतकात Ludvig Holberg (१६८४-१७५४) नावाचा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा एक नाटककार होऊन गेला. त्याचा जन्म जरी नॉर्वेमध्ये झाला होता, तरी त्याने आपले सारे लेखन डॅनिश वाचकांसाठी डेन्मार्कमध्ये केले. तसेच Henrik Wergeland आणि J. S.Welhaven हे दोन वैशिष्ट्यपूर्ण व आकर्षक व्यक्तिमत्त्वाचे कवी १९व्या शतकात होऊन गेले. अन्यथा तेथे केवळ जुने पोवाडे आणि लोककथाच होत्या. आणि त्यावरही स्कॉटीश आणि जर्मन स्कॉलर आता आपला हक्क सांगू लागले होते. Iceland मध्ये देशांतर केलेल्या नॉर्वेजियन कवींने सहा शतकांपूर्वी लिहिलेल्या Icelandic Sagas एकोणिसाव्या शतकातील नॉर्वेजियनांना ज्ञात नव्हत्या.

इब्सेनच्या जन्मकाळातील नॉर्वे हा अजूनही अतिशय प्राथमिक अवस्थेत होता. मध्य युगातील घरांप्रमाणे अतिदूरस्थभागातील घरे ही धूर जाण्यासाठी छिद्रे असलेली, बिन-खिडक्यांची होती. कृषीव्यवसाय विलक्षण पुरातनपद्धतीचा होता. गुरांकरिता उजेड नसलेले गोठे किंवा जेणेकरून जास्तीतजास्त ऊब मिळेल अशा अरुंद खोल्या असत. आणि वसंतऋतू आला म्हणजे ते जिवंत सापळे बाहेर काढले जात व ती साचलेली घाण शेतावर पसरली जाई. कोळी लोक अजूनही दोऱ्या वळून जाळी बनवीत. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस पश्चिम किनाऱ्यावर अजूनही एक टक्का तरी महारोग आढळे. शहरे अतिशय लहान असत ख्रिश्चानिया हे राजधानीचे शहर (आत्ताचे ऑस्लो) फक्त ३०,००० लोकवस्तीचे होते. देशाजवळ कोळसा नव्हता. त्याची फक्त थोडीशीच डोंगराळ जमीन शेती करण्याजोगी होती व एकचतुर्थांश जमीन जंगलांनी व्यापलेली होती. उदरनिर्वाह आणि दळणवळण ह्या बाबतीत लोक बहुतांशी समुद्रावरच अवलंबून असत. नॉर्वेत पहिली रेल्वे दिसण्यापूर्वी इब्सेन प्रौढावस्थेपर्यंत पोहोंचला होता.

शिएन येथे Knud Ibsen एक छोटेसे जनरल स्टोअर्स चालवायचा. तेथून दोन मैलाच्या अंतरावर असलेल्या Venstop येथे Gjerpen च्या प्रदेशात



अनुक्रमणिका

त्याने एकोणतीस एकर जमिनीसह एक श्रीमंती थाटाचे घर घेतले होते. त्याच्या उपलब्ध चित्रावरून तो मध्यम उंचीची, किरकोळ शरीरयष्टीचा, अंडाकृती चेहऱ्याचा, लांबट व काहीशा बाक असलेल्या नाकाचा व लहान तोंडाचा होता. तो थट्टेखोर, उपहासखोर व धूर्त होता. वयाच्या ऐंशीव्या वर्षांपासून दारिद्र्य व अतिमद्यसेवन ह्यातून त्याच्या अपयशी जीवनाला सुरुवात झाली. Peer Gynt मधील Jon Gynt, The League of Youth मधील Daniel Hejree आणि The Wild Duck मधील Old Ekdal अशी आपल्या पित्याची तीन भिन्न पण ओळखू येण्याजोगी चित्रे इब्सेनने आपल्या नाटकांमध्ये रेखाटली आहेत.

इब्सेनची आई Marichen ही दिसायला सुंदर होती. तिला चित्रकलेचा नाद होता व रंगभूमी बद्दलचे जबरदस्त आकर्षण होते. ती प्रसन्नमुख पाणीदार डोळ्यांची व संवेदनशील स्वभावाची होती.

इब्सेनच्या वयाच्या सातव्या वर्षांपर्यंत त्याच्या आईवडिलांचे जीवन सुखी आणि समृद्ध होते. दारमंडपातील एका खिडकीत लहानशा रंगमंचावर इब्सेन, कळसूत्री बाहुल्यांचे खेळ, तिथल्या परिसरातील मुलांना करून दाखवायचा.

शैशवावस्थेतील इब्सेन दिसायला त्याच्या वडिलांसारखाच होता. जरी त्याचा रंग आईसारखा सावळा होता तरी त्याच्या नाकाची ठेवण त्याच्या वडिलांप्रमाणेच लहानशी पण भक्कम होती. चित्रकला आणि वाचन याबरोबरच त्याला कपड्यालत्त्याचाही बराच शौक होता. बऱ्याचवेळा तो पुस्तके, बाहुल्या व चित्रे ह्या साहित्यासह स्वतःला एका खोलीत कोंडून घ्यायचा. १३व्या वर्षी त्याचे नाव एका खाजगी शाळेत घातले गेले. जर्मन व लॅटीन, तो एका Hansen नावाच्या खाजगी शिक्षकाकडून शिकला.

इब्सेन आपल्या भावंडावर रागवला म्हणजे दारांच्या लाकडी तावदानावर त्यांची व्यंगचित्रे काढायचा. Johan ला माकड Hedvig ला अस्वल Ole ला कोल्हा आणि Nicolai ला काहीतरी अनोळखी प्राणी बनवी.

Knud Ibsen ने Venstop येथील हे घर घेण्यापूर्वी ते एका अद्‌भुतरम्य आणि धोक्याचं जीवन जगलेल्या Niels Jorgen Hirscholm ह्या मृत दर्यावर्दीच्या मालकीचे होते. ह्या घराच्या पोटमाळ्यात त्याने अनेक पुस्तके आणून ठेवली होती. त्यापैकी बरीचशी इंग्रजीत होती. तरीही इब्सेनला प्राथमिक ज्ञान मिळविण्यासाठी त्यांचा बराच उपयोग झाला. 'दि वाइल्ड डक' नाटकात त्यातील Harrisons History of London ह्या पुस्तकाचा हेदबिगच्या तोंडी उल्लेख आला आहे तर ह्याच नाटकातील दुसऱ्या अंकाच्या नेपथ्यात त्या पोटमाळ्याचे चित्रण आहे.

Knud Ibsen चे अखेरचे दिवस अतिशय हलाखीत गेले. कर न भरल्यामुळे त्याची बरीच मालमत्ता जप्त करण्यात आली व तो निष्कांचन झाला. त्यामुळे इब्सेनला शाळा सोडावी लागली व चर्च मधल्या धार्मिकविधीत त्याला तिसरा दर्जा देण्यात आला. ह्या अपमानाचा परिणाम म्हणजे Knud Ibsen दारूडा व भ्रमिष्ट झाला. हेन्रिक इब्सेनच्या बालमनावर आणखी एक आघात झाला होता. Henrik हा Knud Ibsen चा मुलगा नसून Tormod Knudsen नावाच्या त्याच्या आईच्या जुन्या चाहत्यापासून झालेला आहे; अशी उघड उघड अफवा होती. इब्सेनचा ह्यावर विश्वास बसला व त्याला आपल्या आईवडिलांबद्दल आदर वाटेनासा झाला. म्हणूनच दिवाळखोरी आणि अनौरसता ही त्याच्या नाटकातून पुन्हा पुन्हा येऊ लागली. The Pretenders मधील Haakon, Peer Gynt मधील Ugly Brat, Ghosts मधील Regina, The Wild Duck मधील Hedvig व Rosmersholm मधील Rebecca West ही स्वभावचित्रे त्याची उदाहरणे आहेत. दारिद्र्याने पछाडलेल्या घरात सुख आणि समाधान नांदेनासे झाले होते. इब्सेनला आता स्वतःच्या उदरनिर्वाहाचे साधन पहाणे भाग होते.

त्याच्या वडिलांच्या एका प्रवासी मित्राने त्याला Grimstad येथील औषध विक्रेत्याकडे सहाय्यकाची नोकरी शोधून काढली. २७ डिसेंबर १८४३ ह्या दिवशी त्याने Lykkens Prove (भाग्यवान संधी) नावाच्या एका लहानशा जहाजावर बसून शिएनचा अखेरचा निरोप घेतला. सात ते पंधरा वर्षांपर्यंतच्या जीवनाच्या ह्या पार्श्वभूमीवर काढलेल्या ह्या निष्ठूर आठ

वर्षांनी त्याच्या हृदयावर जी जखम केली ती पुन्हा कधीच भरून निघाली नाही.

३ जानेवारी १८४४ मध्ये इब्सेन ग्रिमस्ताच्या येथे पोहोचला. जहाजावरचा व्यापार व जहाजबांधणी इ. व्यवसाय असलेले हे शहर फक्त ८०० लोकवस्तीचे होते. इतर करमणुकींबरोबर शिएन प्रमाणे येथेही काही नाटककंपन्या येत असत. पुढे तीस वर्षांनंतर लिहिलेले The Pillars of Society हे नाटक ग्रिमस्ताच्या आठवणींनी पुरेपूर भरलेले आहे.

Napoleonic Wars मधील (ज्यात Norway आणि Denmark फ्रान्सच्या बाजूने लढले होते.) जे काही सैनिक इंग्लंडच्या कैदेत जाऊन आले होते ते आणि १८१४ मधल्या स्विडनविरूद्धच्या अल्पकालीक युद्धात जे Gothenburg च्या कैदेत जाऊन आले होते ते बरेचसे खलाशी ह्या काळात ग्रिमस्तामध्ये वास्तव्य करीत होते व कामाच्या निमित्ताने इब्सेनला त्यांच्यात मिसळावे लागत होते.

ज्या औषधविक्रेत्याच्या दुकानात इब्सेन कामाला होता तो Reimann सुशील स्वभावाचा पण अव्यवहारी होता व त्याचा धंदा घसरणीला लागला होता. याकारणास्तव इब्सेनला इतका तुटपुंजा पगार मिळत असे की, त्यामुळे ऐन हिवाळ्यात ३° सें. तपमान असलेल्या ग्रिमस्तासारख्या गावी त्याला कपडेच काय पण पुरेसे जेवणही घेता येत नसे. आपल्या वडिलांचा गमावलेला नावलौकिक परत मिळविण्याची जिद्द असलेला इब्सेन आलेल्या परिस्थितीशी मोठ्या धैर्याने तोंड देत होता.

ह्या ग्रामीण छिद्रातल्या प्रतिकूल परिस्थितीच्या संघर्षातूनच त्याच्या प्रचंड इच्छाशक्तीचा आणि निर्धाराचा विकास होत होता. शिएनपेक्षाही कंटाळवाणे आणि एकलकोंडे असे त्याचे जीवन झाले होते. तो अधिक अंतर्मुख बनला होता. म्हणूनच, "He went about Grimstad Like an enigma sealed with sevenseals" असं त्याचं वर्णन त्या गावात त्याला ओळखणाऱ्या स्त्रीने केले आहे. ह्या दारिद्र्यामुळे आणि सामाजिक अपकर्षामुळेच त्याची आक्रमक आणि युयुत्सु प्रवृत्ती येथे वाढीस लागली. स्थानिक बड्या व्यक्तींविषयी (ज्यांना तो empty brains with Full Wallets म्हणायचा) उपहासात्मक कविता लिहून व त्यांची व्यंगचित्रे काढून तो आपला दुःख परिहार करायचा. ह्या काळात त्याने भरपूर चित्रेही रंगविली.

शिएनहून येताना त्याने ती सारी पुस्तके पेटीत भरून आणली होती. त्यातील Dickens, Scott, Holberg, Voltaire (ज्याची तो विशेष स्तुती करायचा), त्याचा समकालीन Swedish कादंबरीकार Fredrika Bremer आणि Danish कादंबरीकार Fru Gyllembourg या साऱ्या साहित्यिकांचे लिखाण त्याने ह्या काळात आधाशीपणे वाचून टाकले. औषधविक्रेता Reimann हा reading circle चा सभासद होता, आणि त्याने आपल्या नावावर पुस्तके आणून वाचण्याची इब्सेनला अनुमती दिली होती.

परंतु केवळ एवढ्या वाचनावरच त्याने समाधान मानले नाही. त्याला महाविद्यालयात प्रवेश मिळवायचा होता. त्यासाठी त्याने रात्री जागून मॅट्रीकचा अभ्यास केला. ह्या अभ्यासातूनच त्याला Catilina ह्या त्याच्या पहिल्या नाटकाची कल्पना सुचली होती.

ह्या औषधाच्या दुकानात Else Sofie Jensdatter नावाची एक मोलकरीणही होती. इब्सेनपेक्षा वयाने ती दहा वर्षांनी मोठी होती. तिच्याशी झालेल्या प्रेमप्रकरणाचे पर्यवसान म्हणजे ९ ऑक्टोबर १८४६ ह्या दिवशी इब्सेन तिच्या अनौरस मुलाचा पिता बनला. ह्या अनौरस मुलाच्या पालनपोषणासाठी इब्सेनला मात्र त्याच्या तुटपुंज्या पगारातून पंधरा वर्षांपर्यंत पोटगी द्यावी लागली.

Else ने त्याचे नाव Hans Jacob Henriksen ठेवले. इब्सेनच्या ह्या अनौरस पुत्राची आणि त्याच्या वंशजांची अतिशय दारूण शोकांतिका झाली. तो अतिशय दरिद्री आणि व्यसनी अवस्थेत असताना इब्सेनची आणि त्याची १८९२ मध्ये अखेरची भेट झाली होती.

इब्सेनच्या मनावर, स्वभावावर आणि त्याच्या सर्वांगीण विकासावर ह्याचा सखोल परिणाम झाला. तारुण्यात पडलेल्या ह्या वाकड्या पावलाबद्दल त्याला अडाणी गप्पीदासांच्या गप्पांना तोंड द्यावे लागले. त्याच्या धार्मिक प्रवृत्तीच्या कुटुंबालाही ह्या कुचाळक्या



अनुक्रमणिका

सहन कराव्या लागल्या. अशा समाजात प्रतिष्ठा मिळविण्याचा प्रश्नच नव्हता. ह्याउलट ह्या समाजाबद्दल त्याच्या मनात तिरस्कार आणि रोष निर्माण झाला. एका तरुण अपराध्याचे परिवर्तन एका बंडखोर टीकाकारात झाले.

त्याला आप्तस्वकियांबद्दलही तिटकारा वाटू लागला व ह्या तिटकाऱ्याने इतके विस्तृत रूप धारण केले की आपल्या सर्व देशबांधवाबद्दल त्याला तिटकारा वाटू लागला व त्याची परिणती म्हणजे दुसऱ्या कोणत्यातरी लांब अंतरावरच्या देशात जाऊन रहाण्याची प्रबळ इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली. पुढे त्याने आपल्या ह्या अनौरस संततीच्या बाबतीत जरी कधी रस घेतला नाही; तरीही एका अपराधीपणाच्या भावनेची जाणीव त्याच्या मनात खोल रूतून बसली व ह्याचे प्रायश्चित लवकर घडून यावे, असे त्याला मनापासून वाटू लागले. ह्याचा जबरदस्त परिणाम त्याच्या पुढील लिखाणावर झालेल्या दिसून येतो.

ग्रिमस्ता येथे Georgiana Crawfurd ह्या वृद्ध स्कॉटीश स्त्रीशी त्याचा परिचय झाला. तिने त्याला अनेक पुस्तके पुरविली. ह्या काळात इब्सेनचा Soren Kierkegaard ह्या तत्त्वज्ञानाच्या व Adam Oehlenschlager ह्या सुप्रसिद्ध डॅनिश कवीच्या साहित्याशी परिचय झाला. तसेच Henrik Wergeland ह्या कवीच्या लेखनाचाही त्यावर परिणाम झाला. त्याच्या रचनापद्धतीचे अनुकरण करून ह्या काळात इब्सेनने बऱ्याच कविता लिहिल्या. ह्याच काळात Christopher Due आणि Ole Carelius Schulerud हे दोन मित्र त्याला ग्रिमस्तामध्ये भेटले. ग्रिमस्तासारख्या लहानशा गावातील जुनाट सनातनी लोकांपुढे त्याने आपली निरीश्वरवादी आणि प्रजासत्ताकवादी मते मांडायला सुरुवात केल्याबरोबर प्रथम लोकांचे लक्ष त्याच्याकडे वेधले गेले. विवाह, प्रेम, नीतीशास्त्र आणि धर्म ह्या बाबतीतील त्याची मते आधीच बंडखोर बनलेली होती. त्याने Voltaire चा अभ्यास केला आणि तो एकेश्वरवादी आणि अद्वैतवादाचे समर्थन करू लागला. परमेश्वराचे साक्षात् अस्तित्व मानायला तो स्पष्ट नकार देऊ लागला.

लोकसत्तावादाच्या कल्पनेने नॉर्वेचे लक्ष वेधून घेतले होते आणि त्याचे कारण म्हणजे तीस वर्षांपासून नॉर्वे पारतंत्र्याच्या जुन्या डॅनिश जू खाली होता. स्विडीश राजा आणि त्याने नेमलेल्या नॉर्वेजियन मंत्रिमंडळाच्या अधिराज्यत्वाखाली तो असंतुष्टपणे झुरत होता.

१८४८ च्या फेब्रुवारीत पॅरीस मधील लोक राजाविरूद्ध उभे ठाकले. रस्तोरस्ती झालेल्या दंगलीच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे २४ फेब्रुवारीला Louis Philippe ने अधिकार सोडून पळून जाऊन Surrey च्या बंगल्यात आश्रय घेतला आणि फ्रान्सने आपले राष्ट्र प्रजासत्ताक झाल्याचे जाहीर केले. इब्सेन त्यावेळी २० वर्षांचा होता. ह्या घटनेचा स्फोटक परिणाम त्यावर झाला. ह्या खळबळीच्या वर्षात त्याचे लक्ष वेधून घेणाऱ्या आणखी काही घटना घडल्या. इटलीमध्ये वसंतऋतूत एक राज्यक्रांती झाली, तिचा संसर्ग Rome, Tuin, Leghorn, Pisa Florence आणि Milan लाही झाला. एवढेच नाही तर आष्ट्रियाच्या सामर्थ्यशाली साम्राज्यावर सुद्धा त्याचा परिणाम झाला. १३ मार्चला एका दिवसात धुमाकूळ माजून Metternich चा पाडाव झाला आणि प्रजेला Vienna परत मिळाले. ह्या बातमीने प्रवृत्त होऊन Venice ने सुद्धा धडपड करून आपले राज्य प्रजासत्ताक म्हणून जाहीर करून टाकले. नंतर त्याच महिन्यात Frederick William IV ने सुधारणा करण्याच्या मंजुरीत उशीर केल्यामुळे ह्याच महिन्यात बर्लीनमध्ये धुमाकूळ उडून रक्तपात झाला. त्यावर पार्लमेंटमध्ये बदल घडवून आणण्याची परवानगी देण्यास सक्ती करण्यात आली. मे मध्ये Lombards ने उठाव करून किल्ल्यातील Astrian सैन्य बाहेर हाकलून लावले. जवळच जर्मनीतील राज्यक्रांतीला प्रतिसाद म्हणून ड्यूकच्या ताब्यातील Schleswig आणि Holstein ह्यांनी हातात शस्त्रे घेतली.

ह्या घटनांचा इब्सेनच्या मनावर परिणाम होऊन तो पूर्ण उत्साहाने उत्तरोत्तर प्रजासत्ताकवादी झाला; राजे व बादशहांच्या विरूद्ध भाषणे देऊन प्रजासत्ताकवादाचे समर्थन करू लागला.

जूनमध्ये पॅरीसच्या रस्त्यांवर यादवीयुद्ध सुरू झाले आणि Bohemian बंडखोरांना चिरडून काढण्यासाठी

Prince Windischgratz ने त्याच्या तोफा Prague कडे वळविल्या. ३० ऑक्टोबरला प्रतिगामी Jellacic ने Windischgratz च्या विरूद्ध Vienn च्या मदतीला जाणाऱ्या Hungerian सैन्याचा Schwechat च्या मैदानावर पराभव केला. Vienna मध्ये जवळजवळ पाऊण शतकापर्यंत लोकशाही नव्हती. नोव्हेंबरमध्ये Frederick William IV ने बर्लिन पार्लमेंट बरखास्त केले. त्यानंतरच्या वर्षाच्या एप्रिलमध्ये त्याने Saxony Baden आणि Hanover मधील बंडे चिरडून टाकली. जून मध्ये फ्रेंचांनी Mazzini चे रोमन प्रजासत्ताक Garibaldi चे निर्भय संरक्षण असूनही चिरडून टाकले. २४ ऑक्टोबरला Venetian republic ही कोसळले. Louis Bonaparte चा अनपेक्षित बदल जनतेपुढे येण्यापूर्वीच पॅरीस चेंबरने स्वतःला फ्रान्सचे स्वामित्व बहाल करून टाकले.

युरोपातील या ज्वालामुखीच्या उद्रेकाविषयी सत्तावीस वर्षांनंतर केलेल्या प्रतिक्रियेत तो म्हणतो, "तो अतिशय कोलाहलाचा काळ होता. हंगेरी आणि इतर ठिकाणी उद्भवलेली फेब्रुवारीची राज्यक्रांती Schleswig वरील युद्ध ह्या सर्वांचा माझ्या मनावर परिणाम होऊन तो वृद्धिंगत होत गेला, तथापि तो परिपक्व स्वरुपात येईपर्यंत मला थांबावे लागले. मी अनेक अनुस्पंदनी (resounding) कविता लिहिल्या व त्यातून 'स्वातंत्र्य आणि मानवता ह्यांच्याप्रित्यर्थ हंगेरियनांनी व रशियनांनी जुल्मी राज्यकर्त्यांविरूद्ध लढा देण्याचे कार्य सतत चालू ठेवावे' म्हणून त्यांना उत्तेजन दिले. मला आठवले की किंग ऑस्करला मी लांबलचक सुनिते लिहिली, त्यातून, साऱ्या क्षुद्र जाणीवा बाजूला सारून उशीर न करता आपल्या सैन्याच्या अग्रभागी होऊन आपल्या बांधवांच्या मदतीसाठी कूच करण्याची त्याला मी विनंती केली होती.'[२]

१८४९ च्या पहिल्या तीन महिन्यात त्याने Catiline लिहून पूर्ण केले. ह्याच काळात Clara Ebbell ह्या एकोणीस वर्षे वयाच्या तरुणीवर तो आसक्त झाला आणि अनेक कविता लिहून त्याने तिला त्या अर्पण केल्या. २८ सप्टेंबर १८४९ मध्ये त्याची Autumn ही कविता Christiania मध्ये पहिल्यांदाच प्रसिद्ध झाली.

१८५० मध्ये इब्सेन ख्रिश्चानियाला आला. त्यावेळी हे शहर फक्त ५०००० लोकवस्तीचे होते. तेथे त्याचा मित्र Ole Schulerud याच्या घरी राहून त्याने Heltberg च्या Student fabrik मध्ये मॅट्रीकच्या परीक्षेच्या तयारीसाठी आपले नाव दाखल केले.

ख्रिश्चानिया थिएटरने साभार परत केल्यावर Ole Schulerud ने १२ एप्रिल १८५० मध्ये स्वखर्चाने Catilina हे नाटक छापून घेतले. Henrik Wergeland च्या The Venetians नंतर सात वर्षांनी पहिल्यांदाच प्रसिद्ध होणारे हे पहिले नॉर्वेजियन नाटक होय. इब्सेनने Brynjolf Bjarme ह्या टोपणनावाने ते प्रसिद्ध केले. त्याच्या २५० प्रती छापल्या गेल्या व वर्षभरात फक्त ४५ प्रती खपल्या. हे नाटक त्यांना आठवड्याभरचे जेवणही मिळवून देऊ शकले नाही. शेवटी एका किराणा दुकानदाराला उर्वरित प्रती विकून त्यांना आपला दैनंदिन खर्च भागवावा लागला.

ह्या काळात नॉर्वेजियन रंगभूमी ही पूर्णपणे डॅनिश, फ्रेंच आणि जर्मनी ह्या परकीय नाटकांवर अवलंबून होती.

१८४० च्या दरम्यान नॉर्वेजियन आध्यात्मिक जीवन उदासीन होते, जोरकसपणाचा अभाव असलेले, शांत तसेच निर्भय असून लोक जुन्या आठवणीत गुंग झालेले होते. जगातील प्रगत वाङ्मयाच्या महासागरापासून तुटक असलेल्या एखाद्या शांत तळ्यासारखी त्याची स्थिती होती.

या दरम्यान त्याची Paul Botten Hansen ह्या भाषाकोविदाशी तसेच त्याच्या भावी जीवनावर ज्याचा अधिक प्रभाव पडणार होता त्या Bjornstjerne Bjornson ह्या लेखकाशी त्याची पहिली भेट झाली. Aasmund Vinje आणि Theodor Abildgaard ह्यांच्याशीही इब्सेनची ओळख झाली. Harro Harring नावाच्या जर्मन पुढाऱ्याने The voice of the people नावाचे वर्तमानपत्र सुरू केले. कामगार चळवळींशी ह्या Abildgaard चा संबंध होता. त्यात

इब्सेननेही भाग घेतला होता. नंतर Andhrimner नावाच्या अल्पकालीक नियतकालिकात इब्सेनने रंगभूमी विषयक टीका तसेच प्रचलित घडामोडींवरील आणि राजकीय स्वूपाचे लेख लिहिले, तसेच काही व्यंगचित्रेही काढली. त्या काळातील डाव्या गटातील तसेच Thranitter चळवळीशीही त्याचा संबंध आला.

१८५० च्या मे मध्ये त्याने The Norsemen च्या शीर्षकात बदल करून The Warrior's Barrow नावाचे गीतनाट्य लिहिले. हे नाटक Oehlenschlager च्या ऐतिहासिक शोकान्तिकेच्या साच्याचे होते. Christiania Theatre ने त्याचा स्विकार केल्यामुळे इब्सेनला अधिक प्रोत्साहन मिळाले व त्याने अद्‌भुतरम्य राष्ट्रीय विषयावरील The Ptarmigan of Justedal नावाचे हे निर्यमक नाटकही त्याच वर्षी लिहिले. त्यावेळी इब्सेनने Andreas Fayes चे Norwegian Tales वाचले होते.

ह्या काळात इब्सेनजवळ जेवणापुरतेही पैसे नव्हते. मॅट्रीकच्या परीक्षेतील ग्रीक आणि गणिताच्या परीक्षेत तो नापास झाल्याने त्याला विद्यापीठात प्रवेश मिळणे अशक्य होते. परंतु ह्यापरीक्षेपेक्षाही त्याला सर्जनशील लेखनाचे महत्त्व अधिक वाटल्याने तो त्यानंतर त्या परीक्षेला बसला नाही. त्याने वाङ्मय व सौंदर्यशास्त्र यांचा अभ्यास करायला सुरुवात केली.

त्या काळात Soren Kierkegaard व Hegel ह्यांच्या तत्त्वज्ञानाने युरोपला भारावून टाकले होते. Johan Ludvig Heiberg ह्या डॅनिश ह्या कवी, तत्त्वज्ञानी, समिक्षक आणि नाटककार याचा इब्सेनवर प्रभाव पडला होता. त्याचे On Vaudeville हे छोटेखानी पुस्तक इब्सेनन वाचले होते.

The Warriors Barrow च्या यशामुळे इब्सेनला ख्रिश्चेनिया थिएटर मध्ये विनामूल्य तिकीट मिळू लागले व तेथे होणाऱ्या नाट्यप्रयोगावर टीका लिहिण्याचीही अनुमती मिळाली. द मॅन ह्या नियतकालिकात त्याने प्रख्यात नाटककार Eugene Scribe च्या नाटकांना त्याने Dramatic Candy-Floss म्हटले. त्याच काळात Bellini च्या नॉर्मा ह्या संगितिकेवरून त्याने नॉर्मा ह्या नावाचे विडंबनात्मक काव्य लिहिले.

इब्सेनने आता डॉक्टर किंवा पेंटर होण्याच्या आपल्या पूर्वीच्या आकांक्षा सोडून दिल्या.

१८४९ च्या वसंतऋतूत ऑले बुल नावाचा आंतराष्ट्रीय कीर्ती संपादन केलेला नॉर्वेजियन व्हॉयोलियनवादक अमेरिकेहून बर्गेन येथे परत आला. आपल्या शहरात एक भव्य नॉर्वेजियन नॅशनल थिएटर असावे, असा मानस नागरिकांनी व्यक्त करून त्यासाठी त्याची मदत मागितली. ऑले बुल ने हे मान्य केले व त्याने त्यासाठी अनेक कार्यक्रम आयोजित केले, परंतु त्यातून त्याला पुरेसा प्रतिसाद मिळाला नाही म्हणून त्याने ह्या थिएटरसाठी पार्लमेंटकडे मदत मिळविण्यासाठी अर्ज केला. त्याची विनंती अमान्य करण्यात येऊन त्याविरूद्ध सगळीकडे चर्चेची वादळे उठली, तेव्हा इब्सेनने बुल चे जोरदार समर्थन केले. ख्रिश्चानिया मध्ये प्रदर्शित झालेल्या दि वॉरिअर्स बॉरो बद्दलची ख्याती बुल च्या कानावर गेली. बुल ने इब्सेनची भेट घेऊन इब्सेनला बर्जेन थिएटर मध्ये नोकरी देऊ केली. त्याच प्रमाणे २६ ऑक्टोबर १८५१ ला तो बर्जेन थिएटर मध्ये रंगभूमीचा कवी (Theatre Poet) आणि साहाय्यक म्हणून रूजू झाला. आणि त्याला त्याचा भावीकाळ अधिक उज्ज्वल दिसू लागला.

बर्जेन येथे त्याने जी सहा वर्षे घालविली ती त्याच्या नंतरच्या जीवनक्रमाच्या विकासात प्राणभूत ठरली. रंगभूमीच्या व नाट्यनिर्मितीच्या संदर्भातील फक्त भूमिका सोडून साऱ्या सूक्ष्म गोष्टींचा त्याने अभ्यास केला. ज्या काही जुन्या नाटकांचे तेथे प्रयोग झाले ते बहुतांशी अयशस्वी झाले त्यामुळे थिएटर बोर्डने एका ड्रामॅटीक ऑथर ची निवड करून त्यास फॉरेन थिएटरीकल मेथडस्चा अभ्यास करण्यासाठी व आधुनिक आणि योग्य अशा नाटकांची निवड करून ती उपलब्ध करण्यासाठी परदेशी पाठवायचे ठरविले. त्यात इब्सेनची निवड करण्यात आली व त्याला परकीय रंगभूमीच्या अभ्यासासाठी Copenhagen, Berlin, Dresden आणि हॅमबर्ग येथे १५ एप्रिल १८५२ ह्या दिवशी तीन महिन्याकरीता पाठविण्यात आले.

Copenhagen ह्या डॅनिश राजधानीत असलेल्या

रॉयल थिएटर ह्या युरोपातील विख्यात रंगभूमीला त्याने भेट दिली. फ्रान्स आणि जर्मनीच्या तोडीच्या व इंग्लंडपेक्षाही उत्कृष्ट अशा आंतरराष्ट्रीय नाट्यसंग्रहाशी आणि कलाकारांशी त्याचा परिचय झाला. तेथे Johan Ludvig Heiberg ह्या थिएटर डायरेक्टरशीही त्याचा परिचय झाला. तो केवळ व्यासंगीच नव्हता तर मान्यवर असा कवी आणि नाटककारही होता. त्याने डॅनिश रंगभूमीवर Vaudeville हा करमणुकीचा प्रकार फ्रेंच नमुन्यात पण डॅनिश मांडणीत आणून डॅनिश प्रचलित विषयावर भरपूर लेखन केले होते. ह्याच नाटकांचे अनेक प्रयोग इब्सेनला पुढे बर्जेन आणि ख्रिश्चियना मध्ये करायचे होते. याशिवाय त्याने ह्या थिएटरमध्ये शेक्सपियरची नाटके, हॉलबर्ग च्या सौम्य सुखात्मिका (Vaudeville) यांचे प्रयोग पाहिले. तेथील नट इब्सेनला त्याच्या नॉर्वेजियन नटांपेक्षा कितीतरी सरस वाटले. ज्या छोट्याशा पुस्तकाचा इब्सेनच्या पुढील लेखनावर महत्त्वपूर्ण प्रभाव पडला ते हरमॅन हॅटनर चे Das Moderne Drama हे पुस्तक इब्सेनला येथेच वाचावयास मिळाले. येथे इब्सेनने अनेक नाट्यप्रयोग पाहिले तसेच Dresden येथील J. C. Dahl ह्या चित्रकाराशीही त्याची ओळख झाली. Hofoper येथे त्याने स्टेज मशिनरी चा अभ्यास केला.

ह्या तीन महिन्याच्या परदेशगमनात त्याने Sanethansnatten (सेंट जॉनस् नाईट म्हणजेच मिड्समर नाईट) हे नाटक लिहून पुरे केले.

अध्ययन पर्यटनाहून परत आल्यावर बर्जेन थिएटरमध्ये पाच वर्षांच्या करारावर निर्देशक म्हणून इब्सेनची नेमणूक करण्यात आली. ह्या थिएटरमध्ये दरवर्षी २ जानेवारी ह्या वर्धापन दिनानिमित्त एक नवे नाटक सादर करण्यात येई. ह्या नाट्यलेखनाची जबाबदारी निर्देशकावरच असे. त्यामुळे 'इब्सेन'ला दरवर्षी एक नाटक लिहून सादर करावे लागे. १८५२ च्या शरदऋतूत २ जानेवारी ह्या दिवशी त्याने आपले सेंट जॉनस् नाईट सादर केले. पण ते अपयशी ठरले.

सबंध युरोपातील हा काळ नाटकासाठी अत्यंत वाईट होता. १८०५ मध्ये झालेल्या Schiller च्या मृत्यूनंतर जवळ जवळ अर्धशतकभर रंगभूमी आणि गंभीर नाटककार यांच्यात खिंडार पडलेले होते. अनेक नाटके लिहून तयार होती पण रंगभूमीच्या बाबतीत मागासलेल्या नॉर्वेप्रमाणे त्यांच्या देशातही त्यांचे प्रयोग होत नव्हते.

बर्जेन रंगभूमीच्या ज्या वास्तवस्थितीत इब्सेन कार्य करीत होता ती त्याकाळाच्या पन्नास वर्षे मागे होती. Shekespeare, Holberg, Oehlenschlager, Scribe ह्या नाटककारांची अनेक नाटके त्याने बसविली. ही सर्वच नाटके कलात्मकदृष्ट्या सरस नसली तरी इब्सेनला त्यांच्यापासून बरेच शिकायला मिळाले. रंगतंत्राविषयीचे परिपूर्ण शिक्षण त्याला तेथेच मिळाले. म्हणूनच १० मार्च १८७५ मध्ये Herman Laading ला लिहिलेल्या पत्रात तो म्हणतो,

"Ja, hine ar i Bergen var isandhed mine laerear !"[३]

होय बर्जेनमधील ती वर्षे म्हणजे खरोखर माझ्या उमेदवारीची वर्षे होती !

बर्जेन थिएटरच्या शिरस्त्याप्रमाणे तो दरवर्षी स्वतः लिहिलेले नाटक सादर करीत होता व हे करताना तेथे सादर होत असलेल्या नाटकांचे ही आपसुख अनुकरण करीत होती. १८५३, सेंट जॉन्स नाईट १८५४ वॉरियसर्स बॅरो व १८५५ ला सादर केलेले लेडी इंगेट ऑफ अस्मोत, ह्या नाटकांना जरी समाधानकारक यश लाभले नाही तरी त्यातून त्याच्या नाट्यलेखनात उत्तरोत्तर सुधारणा मात्र होत होती. पुढे १८५६ मध्ये त्याने लिहिलेल्या 'फीस्ट ॲट सूलहॉग' ह्या संगीत काव्यात्म नाटकाला मात्र अपेक्षेपेक्षा अधिक यश मिळाले.

१८५६ च्या जानेवारीत लेखिका आणि नाटककार असलेल्या Magdalene Thoresen शी त्याचा परिचय झाला. त्यातून Suzannah Thoresen नावाच्या तिच्या सावत्र मुलीवर इब्सेनचे प्रेम बसले. इब्सेनने तिला लग्नाची मागणी घातली; आणि १८ जून १८५८ मध्ये अगदी साध्या समारंभात त्यांचा विवाह झाला. इब्सेनच्या आपत्तीच्या काळात हीच एक सुदैवाची बाब होती. Suzannah ने त्याचा संसार सांभाळून त्याच्या आपत्तीच्या आणि उत्कर्षांच्या काळात चांगली साथ दिली. त्याच्या साहित्यिक

जीवनाचा मार्ग सुकर होण्यात तिचा कितीतरी मोठा वाटा आहे.

त्याने १८५७ मध्ये लिहिलेले ओलॅफ लिलेक्रान्स हे नाटकही अपयशी ठरले. ९ जुलै १८५७ रोजी तो रजा काढून ख्रिश्चानिया येथे गेला. तेथे आर्टिस्ट इन्स्ट्रक्टर म्हणून नॉर्वेजियन थिएटर मध्ये त्याची नेमणूक झाली आणि त्याने बर्जेन थिएटर मधील आपल्या पदाचा राजिनामा दिला.

ख्रिश्चानिया थिएटरमध्ये त्याच्या दिग्दर्शनाखाली बसविलेल्या एक-दोन नाटकांच्या प्रयोगाव्यतिरिक्त सारेच प्रयोग अपयशी ठरले. त्यात ख्रिश्चानिया येथील डॅनिश थिएटरच्या स्पर्धेत हे थिएटर थिटे पडले. याच काळात म्हणजे २४ नोव्हेंबर १८५८ ला रंगभूमीवर आलेल्या त्याच्या 'दि व्हायकींग्ज अॅट हेल्गलँड'लाही अपयश मिळाले.

२३ डिसेंबर १८५९ रोजी त्याला मुलगा झाला. 'दि व्हायकींग्ज अॅट हेल्गलँड'मधील नायकाचे सिगार्ड हे नाव त्याने आपल्या मुलाला ठेवले.

६ ऑगस्ट १८६० मध्ये त्याने लंडन, पॅरीस, दि लार्जर जर्मन सीटीज्, कॉपनहॅगन आणि स्टॉकहॉल्म येथे नाट्यकला आणि वाङ्मय यांच्या अभ्यासासाठी मिळणाऱ्या प्रवासीशिष्यवृत्ती साठी सरकारकडे अर्ज केला. पण त्याचा अर्ज फेटाळण्यात आला. अननुभवी नट आणि रंगभूमीवर सादर करण्यासाठी लागणाऱ्या चांगल्या व प्रयोगक्षम नाटकांचा अभाव ह्या अडचणींमुळे त्याचे कार्य मंदावले, परिणामी थिएटरबोर्डने त्यावर टीका केली आणि वर्तमानपत्रांनीही त्याच्याविरूद्ध काहूर माजविले.

ह्या काळात इब्सेनची आर्थिक परिस्थिती अत्यंत वाईट होती. तो कर्जात बुडाला व सावकारांनी त्याची मालमत्ता जप्त करून विकली. त्यामुळे त्याला मद्यपानाचे व्यसन जडले; आणि त्याचा खूपच अतिरेक झाला. शिष्यवृत्तीच्या रूपाने त्याने कर्ज काढले. तरीही ह्याकाळात त्याने लव्हस् कॉमेडी सारखे उपहासात्मक नाटक लिहिले.

नॉर्वेजियन लोककथांनी त्याचे मन आकर्षून घेतले व तो कथांचा संग्रह करण्यासाठी ख्रिश्चानियाबाहेर पडला. ह्या भ्रमंतीचे फलित म्हणजे १८६३ च्या जुलै-ऑगस्टमध्ये त्याने लिहिलेले सागा प्ले : दि प्रेटेंडर्स होय. हे नाटक बऱ्यापैकी गाजले.

१५ नोव्हेंबर १८६३ मध्ये डेन्मार्कचा किंग फ्रेड्रिक-७ पुत्रहीन मरण पावला व त्याची जागा त्याच्या जवळच्या नातेवाईकाने ख्रिश्चन-९ ने घेतली. त्यामुळे Holstein आणि Duchies of Schleswig च्या भयंकर समस्येने डोके वर काढले. ख्रिस्तीयनची सत्ता त्यांनी अमान्य केली आणि कलह माजला. Duchies वर अधिराज्य करणाऱ्या डॅनिशचा, जर्मन पूर्वीपासून तिटकारा करीत होतेच. ह्या कारणामुळे जर्मन राष्ट्रांनी आस्ट्रीयाकडून पाठिंबा मिळालेला ऑगस्टियनबर्ग आणि बिसमार्क यांना आपले रास्त सत्ताधारी म्हणून जाहीर केले. निर्वाणीचा खलिता पाठविला आणि १ फेब्रुवारीस Prusian सैन्याने Shleswig वर हल्ला केला.

स्विडन आणि नॉर्वेचा राजा कार्ल-१५ आणि त्याचा विदेशमंत्री यांनी डेन्मार्कला पाठिंबा दिला. डेन्मार्कचे स्वातंत्र्य जर धोक्यात आले तर स्विडन आणि नॉर्वे त्याच्या मदतीसाठी धावून जाईल हे इब्सेनसह सर्व स्कँडिनेव्हियन नागरिकांनी जाहीर केले. त्याचप्रमाणे कार्ल-१५ ने डेन्मार्क ला सैन्याची मदत देऊ केली. परंतु स्विडिश गव्हर्नमेंटच्या अंतर्गत तटस्थतावादामुळे राजाचे हात बांधले गेले, आणि परिणामी ऐन संकटाचे वेळी डेन्मार्क एकाकी पडले. खरे म्हणजे डेन्मार्क, स्विडन आणि नॉर्वे ही एकाच स्कँडिनेव्हियन गटातील राष्ट्रे डेन्मार्कच्या मदतीला धावून जाणे हे नॉर्वे आणि स्विडनचे कर्तव्य होते. पण डेन्मार्क एकटेच लढत होते. महिना भरातच डिब्बल येथे डॅनिश फौजांचा पराभव झाला. इब्सेनच्या मनावर याचा खूप मोठा परिणाम झाला. डेन्मार्कच्या ह्या पराभवास अंशतः का होईना आपण जबाबदार आहोत ह्याची एक स्कँडिनेव्हियन या नात्याने त्याला तीव्र दुःखद जाणीव झाली व आपल्या देशबांधवांनी डेन्मार्कच्या केलेल्या विश्वासघाताचा त्याला अतिशय संताप आला. त्यावर त्याने 'ब्रदर्स इन नीड' ही उपहासात्मक कविता लिहिली. इब्सेनच्या कोंडलेल्या ऊर्जस्वल भावनांना अभिव्यक्त होण्यास मुक्तद्वार मिळाले.

१८६४ च्या एप्रिलमध्ये सुझान आणि सिगार्ड ला

सोडून इब्सेन बर्लिनला आला. तेथे डॉयवॉल मध्ये काबीज केलेल्या डॅनिश तोफांसह रस्त्यातून जययात्रा काढण्यात आली तेव्हा जर्मनलोक तिच्यावर थुंकले, हे इब्सेनने प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिले तेव्हा,

"I saw the rabble spit into the mouths of the cannon from Dybbol, and to me it seemed an omen that history will one day spit in the face of Sweden and Norway because of their behaviour then."[४]

असा संताप Magdaiene Thoresen ला ३ डिसेंबर १८६५ रोजी लिहिलेल्या पत्रात त्याने व्यक्त केला.

इब्सेनने स्वतःहून हा वनवास पत्करला होता. आपल्या देशबांधवांनी केलेल्या अपराधाचे हे प्रायश्चितच तो यातून घेत होता. त्यात त्याच्या आर्थिक परिस्थितीनेही त्याला गांजून टाकले होते. ह्या काळात लिहिलेल्या एका कवितेत स्वतःला त्याने Eider Duck कल्पिले. ह्या Eider Duck चे घरटे खाडीच्या किनाऱ्यावर असते व दरवेळेला एक कोळी त्याचा अपहार करतो. पण तरीही तो आपले घरटे पुन्हा बांधतो. मात्र तिसऱ्यांदा त्या कोळ्याने ते लुटून नेल्यावर हा पक्षी आपले पंख पसरून दक्षिणेकडे सूर्याच्या दिशेने मुकाट्याने निघून जातो.

१८४३ मध्ये हृदयावर खोल जखमा घेऊन जसे त्याने शिएन सोडले होते तसेच आत्ताही ह्या जखमा उराशी घेऊन तो नॉर्वे सोडत होता, मात्र या वेदनांना उत्कट संवेदनांची प्रगाढता लाभलेली होती.

मात्र तो आता पूर्वीपेक्षा सुंदर पोषाख करू लागला, आपले अक्षरही त्याने अधिक वळणदार बनविले. इटलीतील निसर्गरम्य, उबदार व देखण्या वातावरणातही त्याला जुन्या आठवणी बेचैन करून सोडीत. मात्र त्याच्या ह्या अल्पकालिक मुक्कामाची पहिली फळे म्हणजे ब्रॅण्ड (१८६६) आणि Peer Gynt (१८६७) ह्या दोन अप्रतिम कलाकृती होत.

तेथील उत्साहवर्धक वातावरणाचा पुरेपूर फायदा घेऊन त्याने 'एम्पॉरर अँड गॅलिलिन' सारखे तत्त्वज्ञानात्मक व ऐतिहासिक असे जाडजूड नाटकही ड्रेसडेन येथेच पूर्ण केले. 'दि लिग ऑफ यूथ' ह्या उपहासात्मक आचारविनोदिनीची कल्पनाही त्याला येथेच सुचली.

तो स्टॉकहोल्म येथे असताना त्याला इजिप्तचे आमंत्रण आले. Marseilles हून इजिप्त तेथून नेव्हीया आणि तांबड्या समुद्राच्या मार्गाने तो सूझ कॅनल च्या उद्घाटनाला नॉर्वेचा प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहिला. पॅरिसच्या मार्गाने तो ड्रेसडेनला आला. १८७१ च्या फेब्रुवारीत डेन्मार्कने त्याचा ऑर्डर ऑफ डॅनब्रोग चा सन्मान वहाल करून गौरव केला, तर १८७६ च्या जूनमध्ये बर्लिन येथे Duke of Saxe Meiningen ने Saxon-Ernestine Order देऊन सन्मान केला. ५ सप्टेंबर १८७७ मध्ये स्विडनच्या अॅपसाला युनिव्हर्सिटीने त्याला ऑनररी डॉक्टरेट ही पदवी प्रदान केली.

काव्यात्म नाटकापेक्षा सर्वसामान्यलोक छायाचित्रणात्मक वास्तववादी नाटके अधिक पसंत करतात; हे पाहून त्याने 'पिलर्स ऑफ सोसायटी' हे नाटक लिहिले. तत्कालीन राजकीय परिस्थितीचा त्यात उपहास केलेला होता त्यामुळे हे नाटक खूपच गाजले. 'ए डॉल्स् हाऊस' (१८७९) आणि 'घोस्टस्' (१८८१) ह्या दोन नाटकातून त्याने समाजावर हल्ला चढविला. त्यावरील कठोर प्रतिक्रियांना तोंड देत असताना 'अॅन एनिमी ऑफ द पिपल' ह्या नाटकाद्वारे त्याने त्या टीकेला उत्तर दिले.

तथापि 'द वाइल्ड डक' नंतरची युयुत्सू वृत्ती कमी होऊन पृथक्करणात्मक आणि विश्लेषणात्मक प्रवृत्तीकडे तो अधिक झुकला.

१६ जुलै १८९१ मध्ये इब्सेन आपल्या नॉर्वेत परतला होता. त्यापूर्वी लिहिलेली Rosmersholm (१८८६) द लेडी फ्राम द सी (१८८८) हेडा गॅब्लर (१८९०) आणि त्यानंतर लिहिलेला द मास्टर बिल्डर (१८९२), लिटील यॉल्फ (१८९४), जॉन गॅब्रिल बॉर्कमन (१८९६), व्हेन वुइ डेड अवेकन (१८९९) ह्या विरोधाभासात्मक विषय व प्रच्छन्न किंवा उघड प्रतिवाद असलेल्या नाटकांनी त्याच्या टीकाकारात खळबळ माजवून दिली.

१८९९ च्या सप्टेंबर मध्ये ऑस्लो येथील नॅशनल





अनुक्रमणिका

थिएटरच्यासमोर त्याचा भव्य पुतळा उभारण्यात आला. आपल्या देशबांधवांकडून त्याला हा सन्मान व कीर्ती जीवंतपणी मिळाली. तो वैभवाच्या शिखरावर होता. त्याची नाटके सबंध युरोपभर गाजू लागली होती. अनेक ठिकाणी त्यांचे यशस्वी प्रयोग होऊ लागले होते, आणि ती इतर युरोपियन भाषेत भाषांतरीत होऊन व प्रकाशित होऊन त्यांच्या अनेक आवृत्त्या निघू लागल्या होत्या.

२० मार्च १८९८ मध्ये त्याच्या सत्तराव्या वाढदिवशी साऱ्या जगाने त्याला शुभेच्छा पाठविल्या. अनेक पुरस्कार आणि मानसन्मान त्याला मिळालेत. २३ मार्चला ख्रिश्चानिया शहराने त्याला सरकारी मेजवानी देऊन त्याचा मोठा सत्कार केला.

मार्च १९०० पासून मात्र इब्सेनची प्रकृती ढासळू लागली. त्याला मस्तिष्काघाताचे झटके येऊ लागले. १४ फेब्रुवारी १९०४ ह्या दिवशी इब्सेनने शेवटचा शब्द 'टॅक !' (धन्यवाद !) लिहिला. हा शब्द लिहायला त्याला तीन दिवस लागले. त्याला अर्धांगवायूचा झटकाही आला होता.

'माझ्या जीवनातील मार्गदर्शक तारा' म्हणून त्याने अखेरीस आपल्या पत्नीविषयी कृतज्ञता प्रकट केली. २३ मे १९०६ रोजी दुपारी दोन वाजून तीस मिनिटांनी इब्सेनने देह ठेवलां. नॉर्वेजियन गव्हर्नमेंटने सरकारी इतमामात त्याचा अंत्यविधी पार पाडला.

१८५० मध्ये त्याने लिहिलेल्या Bergmannen (खाणीकामगार) ह्या कवितेला अनुलक्षून त्याच्या समाधीस्तंभावर एका हातोड्याचे चित्र कोरण्यात आले. ह्या कवितेत शेवटी तो म्हणतो,

Nei, i dypet ma jeg ned;
der er fred fra evighed.
Bryt meg veien, tunge hammer,
til det dulgtes hjertekammer !

Hammerslag pa hammerslag
inntil livets siste dag.
Ingen morgenstrale skinner;
ingen hapets sol opprinner.

(नच, मज प्राप्त उतरणे खोल तिथे
अनंतातली शांती जिथे
मम अवजड घनजिव्हा, फोडित
लपल्या हृदयाच्या कप्प्याप्रत.

घावावरती घाव घणाचा
पावेतो जीवनात दिनांला
ना प्रकाश उषःकिरणाचा
ना प्रभात सूर्याची वांछा)

जीवनाच्या अगम्य कोड्याच्या खाणीतून अविश्वास शोध घेत, मानवाच्या प्रच्छन्न हृदयांचा वेध घेत हरपले श्रेय मिळवू पहाणारा असा हा महान क्रांतीकारक कवी आणि नाटककार होता.

**वसंत बागुल**
न्यू शिवम अपार्टमेंट, फ्लॅट नं. ३०२,
जुना वॉटर सप्लाय ऑफिस समोर, स्टेशन रोड,
उल्हासनगर -४ जि. ठाणे ४२१२ ००४.
फोन : ०२५१ २५८७८३२
E-mail : vasant_pandit2002@yahoo.com





अनुक्रमणिका



पुस्तक परिचय

## शोध निळ्या नभातील वादळाचा !!

राज अहेरराव

कवी भगवान ठाकूर यांचा 'वादळ निळ्या नभातील' हा कवितासंग्रह नुकताच वाचण्यात आला. विशेष म्हणजे एका बैठकीत तो वाचून संपवला.

मात्र जेव्हा त्या कवितासंग्रहाची शेवटची कविता वाचून पुस्तक मिटले तेव्हा का कुणास ठाऊक असे वाटले आता तर सुरूवात आहे. हा सहजानुभव सर्वांनी कवितासंग्रह वाचल्याशिवाय जाणवणार नाही.

भगवान ठाकूर यांनी ४८ कवितारुपी पावलात निळ्या नभातील वादळाला पालाण घालण्याचे जे प्रातिभ कार्य केले ते वाखाणण्याजोगे आहे. हा काव्यसंग्रह वाचताना रसिकांनी कवितेच्या पल्किडे जाऊन भावार्थ शोधावा; म्हणजे निळ्या नभातील वादळाची परिपक्वता खऱ्या अर्थाने जाणवेल.

या काव्यसंग्रहात मुक्तछंद व गेयता यांचे मिश्रण आहे. हा प्रयोग प्रवोधनाच्या दृष्टीने अतिशय प्रभावी व महत्त्वाचा आहे. याचे कारण म्हणजे, वाचक जरी कवी नसला तरी कवीचे वैचारिक ध्येय व अर्थसौंदर्याचा परीघ काव्यसंग्रहाच्या माध्यमातून रसिकत्वाच्या बळावर सहज आकळू शकेल.

काव्यशास्त्रदृष्ट्या मुक्तछंद हा काव्यप्रकार जरी विचारसौंदर्य रेखाटणारा असला; तरी अशा मुक्तछंदात एक अंगभूत गेयता असतेच. मात्र येथे कवीने जळत्या विस्तवाचे, धगधगत्या वणव्याचे व भळभळत्या जखमांचे विचारविश्व उभे केले आहे. म्हणून अशा मुक्तछंदात्मक काव्याला नियमांचे बंधन रहात नाही; कारण हे काव्य समाजाला मार्गदर्शक म्हणून पिढ्यान्‌पिढ्या पुरत असते.

कवीने आतापर्यंत ललित, समीक्षात्मक, वैचारिक, संशोधनात्मक, लोकसाहित्य, शाहिरी जलसे असे अनेक विषय यशस्वीपणे हाताळले आहेत. नंतर ते निळ्या जाणीवांचे वाटसरू झाले. एकाने दुसऱ्याची केलेली अवहेलना कवीच्या मानवतावादी मनाला बघवली नसेल; असे मला कवितेवरून तरी जाणवते. म्हणूनच त्यांनी निळ्या क्रांतीचा ध्यास घेतलेला असावा. कवीच्या ध्यासाचा काव्यसमीक्षेच्या दृष्टीने विचार केला तर असे जाणवते की, जे कवी मानवी मनाच्या खोलीचा धांडोळा घेतात, प्रस्थापित स्थूलाच्या पलिकडे जाऊन त्याचा उभा-आडवा छेद घेतात; त्यांनाच मानवी जीवनातील लाळघोटे रंग, सोज्वळ हिमरू संमोहन, मुरब्बी कातडीचा पोत, काच-कचकड्याचे कायदे, सूक्तांचे विविध प्रकार, मानदंडाचे महावस्त्र, सूर्यभर भूक, गर्भातील बळ इत्यादी गोष्टी दिसू लागतात. अशा वेळी कवीचे मन त्याचे एकट्याचे राहत नाही. साऱ्या समाजाचे मन त्याचे एकट्याचे होऊन जाते. अशा वेळी देहाचे विहार होते व श्वासाश्वासातून वोधीविचारसुगंधाचा घमघमाट दरवळायला लागतो. कवी या अवस्थेच्या जवळ जाऊ पहात आहे.

वादळ निळ्या नभातील - डॉ. भगवान ठाकूर,
सुगावा प्रकाशन, पुणे (२००९)

❖❖❖

राज अहेरराव
भ्रमणभाष : ९८८१३७१०१५

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
**ग्रंथ-पारितोषिके**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने प्रतिवर्षी देण्यात येणारे साहित्य पुरस्कार, हे १ जानेवारी २०१० ते ३१ डिसेंबर २०१० या कालखंडात प्रकाशित झालेल्या ग्रंथांना देण्यात येणार आहेत. या कालखंडातील प्रकाशित ग्रंथ, पुरस्काराच्या विचारार्थ, ग्राह्य धरले जातील. याची लेखक व प्रकाशकांनी नोंद घेऊन आपले ग्रंथ पाठवावेत, ही विनंती.



अनुक्रमणिका

# शिवशाहीर : महात्मा फुले

- प्रा. डॉ. अशोक भीमराज शिंदे

*[ सत्यशोधक महात्मा फुले यांच्या साहित्यात छत्रपती शिवरायांवरील पोवाडा तसा अलक्षित राहिला. डॉ. शिंदे यांनी ही तुलना करून ह्या पोवाड्याचे अंतरंग शोधण्यासाठी लिहिलेला हा शोधनिबंध ! – संपादक ]*

इ.स. १८६९ मध्ये महात्मा ज्योतीराव फुल्यांनी शिवचरित्रासारखा अवघड विषय पोवाडा काव्यमाध्यमात गतीशिलतेने व्यक्त केला आहे. "राजा क्षेत्र्यामधी पहिला । नाही दुसरा उपमेला ॥" अशा सार्थ शब्दात छत्रपती शिवरायांचा त्यांनी गौरव केला आहे. फुल्यांनी छत्रपती शिवाजीराजे भोसले यांच्यावरील लिहिलेल्या पोवाड्याची भाषा म्हणजे जनसमुदायाला स्वयंभूपणाने जागृत करणारे जनशक्तीचे महत्त्वाचे साधन आहे. सामाजिक प्रबोधनाचा आणि वैज्ञानिक दृष्टीचा मिलाफ या पोवाड्यात आहे.

महात्मा फुले हे क्रांतीकारक समाजसुधारक होते. त्यांना क्रांतीकारक कल्पना कृतीशील करून लोकमानस बदलायचे होते; हेच त्यांच्या शिवाजी महाराजांच्या पोवाड्यातून आपणास जाणवते. महाराष्ट्राला सामाजिक क्रांतीचे प्रणेते म्हणून महात्मा फुले परिचित आहेत. व्यापक दृष्टी, विशुद्ध चारित्र्य, निःस्वार्थी जीवन, या गुणांचा मिलाफ म्हणजे महात्मा फुले होय ! म्हणूनच महाराष्ट्राचा 'मार्टिन ल्युथर' अशा शब्दात फुल्यांचा गौरव केला जातो. प्रा. बा. ह. कल्याणकरांनी ज्योतीराव फुले हे प्रचंड असे, समाज परिवर्तनाचे समाजसुधारणेचे, धगधगत्या वास्तववादावर उभे असलेले सामाजिक विचाराचे पहिले 'भारतीय समाज विद्यापीठ होते.' फुल्यांविषयी खरोखर हे सार्थ उद्‌गार आहेत.[१]

महात्मा फुले यांनी सामाजिक निष्ठेने लेखन केले आहे.

१) तृतीय रत्न - नाटक (१८५५)
२) छत्रपती शिवाजीराजे भोसले यांचा पोवाडा (१८६९)
३) ब्राह्मणाचे कसब (१८६९)
४) गुलामगिरी (१८७३)
५) शेकऱ्यांचा आसूड (१८८३)
६) सत्सार अंक १ व २ (१८८५)
७) इशारा (१८८५)
८) अस्पृश्यांची कैफियत (१८८५)
९) सत्यशोधक समाजोक्त मंगलाष्टकांसह सर्व पूजाविधी प्रारंभ (१८८७)
१०) सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक (१८९१)
११) अखंडादी काव्यरचना (रचनाकाळ उपलब्ध नाही.)

या ग्रंथाखेरीज फुल्यांचे पुढील स्फुट लेखन आढळते.

१) सत्यशोधक समाजाची तिसऱ्या वार्षिक समारंभाची हकीगत (सप्टेंबर १८७६)
२) दुष्काळ विषयक विनंतीपत्रक (मे १८७७)
३) हंटर शिक्षण आयोगापुढे सादर केलेले निवेदन (ऑक्टोवर १८८२)
४) ग्रामजोशासंवंधी जाहीर खबर (१८८६)
५) मराठी ग्रंथकार सभेस पत्र (जून १८८५)
६) मामा परमानंद यास पत्र (जून १८८५)

या स्फुट लेखनाचे स्वरुप प्रचलित भाषेत पत्रकवजा म्हणावे लागेल.

महात्मा फुले यांनी छत्रपती शिवाजीराजे भोसले यांचा पोवाडा १८६९ मध्ये लोकहितार्थ केला. माळी-कुणब्यास सोप्या भाषेत शिवचरित्र सांगण्याची प्रतिज्ञा करूनच फुल्यांनी हा पोवाडा लिहिला आहे. जोतीरावांचा पोवाडा दक्षिणा प्राईझ कमिटीकडे बक्षिसासाठी सादर करण्यात आला होता. त्यावेळेस गणेश शास्त्री लेले यांच्या शिवाजी चरित्रास ३०० रुपयाचे रोख पारितोषिक मिळाले. म. मो. कुंटे यांच्या राजा शिवाजी काव्यास १०० रुपये पारितोषिक मिळाले. दक्षिणा प्राईझ कमिटीची पारितोषिके पंडिती परंपरा असणाऱ्या काव्यासच मिळत. ग्रामीण भाषेची फारशी दखल या कमेटीने घेतली नाही. त्यामुळे

अनुक्रमणिका

फुल्यासारख्या ग्रामीण लोकभाषेत पोवाडा करणारा कवी या दक्षिणा प्राईझ कमिटीच्या बक्षिसास अपात्र ठरला. फुल्यांनी लोकसाहित्याच्या माध्यमातून म्हणजे पोवाड्यातून शिवचरित्र गायले आहे.

कवी, नाटककार, कादंबरीकार, अथवा कोणताही लेखक इतिहासाने नोंदलेल्या प्रत्यक्ष घटनांची बंधने पाळूनच आपले सर्जन साधीत असतो. कागदोपत्री आणि इतिहासाने नोंदलेल्या व्यक्ती व घटना यांच्याशी संबंध असलेल्या एका अर्थपूर्ण अनुभवाची इमारत ते रचत असतात. म. फुले यांनी मोठ्या उत्सुकतेने व अभिमानाने रायगड पाहिला. शिवाजी महाराजांच्या समाधीची दुर्दशा पाहून त्यांचा जीव हळहळला. त्यांनी दगडधोंडे कचऱ्यांचे ढीग समाधीवरून दूर केले. तेथे स्फूर्ती घेऊन त्यांनी शिवाजी महाराजांवर एक मोठा पोवाडा केला. तो पोवाडा १८६९ मध्ये प्रसिद्ध केला. ज्योतीरावांच्या नवविचारांनी भारलेला असून तो अत्यंत स्फूर्तीदायक आहे.

हा पोवाडा ४० पृष्ठांचा आहे. ज्योतीराव हे गद्यापेक्षा काव्यातच अधिक लीलेने संचार करतात. हे त्यांच्या काव्यावरून दिसते. जुन्या शाहिरांनी परंपरागत पद्धतीने शिवचरित्र गायिले होते. शैली व आशय या दृष्टीने पोवाडे काहीसे साचेबंद झाले होते. इंग्रजी कालखंडात साहित्याकडे बघण्याची सर्वांचीच दृष्टी बदलली. फुल्यांची विचारसरणी ही एक प्रचंड सामर्थ्य असलेली ठिणगी होती. शूद्रातिशूद्रात आत्मसन्मानाची भावना त्यांनी निर्माण केली. इंग्रजी राजवटीतील महाराष्ट्रातील जोतीराव फुले हे शिवाजीचे पहिले पोवाडेकार होते.

कविता ही एक आंतरिक घटना असते. भाववृत्ती हाच तिचा आशय असतो. ती कविपरत्वे व कालपरत्वे वेगळी असू शकते; म्हणून कवितेचे विषय तेच तेच असले तरी त्यात आकरित होणारी भाववृत्ती तीच ती असत नाही. शिवचरित्रावर अनेक काव्यरचना झाल्या आहेत. पण फुल्यांचा पोवाडा ऐतिहासिकदृष्ट्या व सामाजिकदृष्ट्या महत्त्वपूर्ण आहे. महात्मा फुल्यांनी शिवाजीवर स्वतंत्रपणे लिहिले आहे. ते अगदी वेगळ्याच स्वरुपातील आहे. माळी कुणब्यास समजणाऱ्या सोप्या भाषेत शिवचरित्र सांगण्याची प्रतिज्ञा करूनच फुल्यांनी हा पोवाडा लिहिला आहे. फुल्यांनी आपल्या पोवाड्यात भाकड दंतकथांना स्थान देण्याचे कटाक्षाने टाळले आहे. समाजातील सर्व थरांचे आणि विभागाचे त्यांनी सातत्याने निरीक्षण केले होते. विषमता निर्माण करणाऱ्या पारंपारीक समाजरचनेबद्दल त्यांनी पोटतिडकीने लिहिले. सामाजिक समता प्रस्थापित करण्याकरता आणि सामाजिक न्याय मिळवून देण्यासाठी त्यांनी चळवळ सुरू केली.

ज्योतीरावांच्या पिढीत शिवाजीच्या महान व वैभवशाली कार्याकडे महाराष्ट्राचे लक्ष वेधून घेणारे जोतीराव हे पहिले महाराष्ट्रीय पुढारी होते.जोतीरावांनी त्यांच्या पराक्रमाचे व वैभवशाली राजवटीचे पोवाडे गायले. शिवाजी हा खरोखर अमरकृती करणारा लोकनायकच होता. या लोकनायकाविषयी कवी भूषण म्हणतो

"तीन पुर त्रिपुर के मारे शिव तीन बान । तीन पातशाही हनी एक किरवान (कृपाण) ॥ कवी भूषण शिवाजीला आपल्या काव्याचा नायक मानतो कवी भूषण म्हणतो"

"प्राचीन काळी भगवान शंकराने तीन बाण मारून त्रिपुर दाह केला. पण छत्रपती शिवाजीने एकाच तलवारीने आदिलशाही, कुतुबशाही व औरंगजेबाला ठोकून काढले." (डॉ. श. गो. राजवाडे 'कवी-भूषण व शिवाजी' लेख 'शिवरायासी आठवावे' मासिक संपादन १९७५)

छत्रपती शिवरायामध्ये अद्वितीय नेतृत्व प्रखर बुद्धिमत्ता चातुर्य व पराक्रम सामावलेला होता. हिंदुस्थानच्या नकाशावर स्वतंत्र अस्मितेचे महाराष्ट्राचे स्वराज्य निर्माण करणारा शिवाजी, फुल्यांना बहुजन समाजाचा आद्य स्फूर्तिदाता वाटला. इ. स. १८८० साली जोतीरावांनी शिवाजी महाराजांच्या समाधी विषयी जी कार्य सुरू केले ते लोकमान्य टिळकादी पुण्यातील नेत्यांनी १८९५ साली तडीस नेले. शिवकार्याबद्दलचे फुल्यांचे मूल्यमापन टिळक-रानडे यांच्या अगोदर २५-३० वर्षे होते. यातच फुल्यांच्या समाज प्रबोधनाचा दृष्टीकोन दिसून येतो.

म. फुले यांनी जो छत्रपती शिवाजीवर पोवाडा लिहिला. त्यात संपूर्ण राष्ट्रपुरुषाचे व्यक्तित्व आपल्या

समोर येते. शिवाजीचे बालपण, जिजाईने शिवाजीवर केलेले संस्कार, शिवाजीने जिंकलेले किल्ले, शिवाजीने मिळविलेले मावळ्यांचे सहकार्य, अफजलखान वध, शाईस्तेखान भेट प्रसंग, औरंगजेबाचा स्वभाव, शहाजीचा मृत्यू, इ. प्रसंग फुल्यांनी पोवाड्यात व्यक्त केले आहे. पोवाड्याच्या शेवटी शिवाजी राजाच्या मृत्यूच्या प्रसंगी कुळवाड्यांना झालेला शोक फुल्यांनी सूचकतेने रेखाटला आहे. 'थोडक्यात छत्रपती शिवाजीराजाचे स्फूर्तीप्रद जीवन गायिले आहे.

'पोवाडा' ही ऐतिहासिक काळाशी व ऐतिहासिक व्यक्ति- जीवन-चरित्र-प्रसंगाशी संबंधित असलेली रचना असते. परंतु फुल्यांनी आपला पोवाडा पारंपारिकदृष्ट्या लिहिला नाही. लोकहितदक्ष मूल्याच्या भक्षणाच्या विरोधी स्विकारलेल्या सततच्या दक्षस्थितीचा प्रत्यय या पोवाड्यात येतो' असे डॉ. एस. एस. भोसले याचे मत आहे.[२]

सरळ ठोक व्यवहाराचे खुल्लमखुल्ला नेटदार प्रदर्शन करणे हा या पोवाड्याचा गाभा आहे 'शेतकऱ्यांचा आसूड', 'ब्राह्मणाचे कसब', 'गुलामगिरी' आदी लेखन करणाऱ्या जोतीबांचे व्यक्तिमत्त्व कृतीवीर सुधारकाचे होते. त्याकाळी फुल्यांना जी काय माहिती किंवा साधनसामुग्री उपलब्ध होती त्यांचा कसोशीने मागोवा घेऊन फुल्यांनी या पोवाड्यात शिवचरित्र सांगितले आहे. शिवकार्यांच्या तत्कालीन प्रचलीत जाणीव कल्पनापेक्षा फुल्यांच्या कल्पना किती वेगळ्या होत्या आणि त्या कष्टकरी जनतेशी शूद्रातिशूद्रांशी किती निगडीत होत्या, ही गोष्ट पोवाड्याच्या प्रारंभावरून स्पष्ट होते.

जोतीराव फुले यांच्या पोवाड्यात लोकोत्तर वीर पुरुष, स्वराज्य-संस्थापक, कल्याणकारी- राज्यकर्ता इ. नात्यांनी शिवाजीची महती पोवाड्यातून गायली आहे. फुल्यांना मनुप्रणालीत असणारी चातुवर्ण्यांच्या चौकटीतील सामाजिक गुलामगिरी नष्ट करावयाची होती म्हणून फुल्यांचे लेखन प्रासंगिक असले तरी त्यात प्रबोधनाची झेप आहे. आपल्यावर इंग्रजांनी लादलेली राजकीय गुलामगिरी आज ना उद्या संपणारच परंतु सामाजिक गुलामगिरी मात्र सहजासहजी जाणार नाही; हे फुल्यांना माहीत होते. फुले यांनी शिवाजीवर पोवाडा लिहिला त्याहीवेळी ते मनूचे विरोधक दिसतात. शिवाजीला लाखांचा पोशिंदा, छत्रपती, कुळवाडीभूषण, म्हणजे राज्याभिषेक वर्णन टाळणे इ. अनेक कल्पनांवरून म. फुल्यांना या पोवाड्याचा मोहरा समाजपरिवर्तनशीलतेचा करायचा होता. पोवाड्यापासून फक्त वाङ्मयीन कलानंद मिळाला पाहिजे हा त्यांचा हेतू नव्हता.

म. फुले यांनी लोकसंवाद आणि लोकभाषेच्या माध्यमातून आपले काव्य फुलवलेले आहे. परंपरेला नकार देऊन नवदर्शन घडविणे हे फुल्यांचे ध्येय होते. छत्रपती शिवाजींसारख्या अद्वितीय व्यक्तिमत्त्वाची शिवप्रतिमा त्यांनी पोवाड्यातून रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. म. फुले यांनी पोवाड्याच्या प्रस्तावनेत म्हटले आहे की ''अति जुनाट यवनी व मेसर्स ग्रांट डफ मेरी वगैरे इंग्रज लोकांच्या बहुतेक लेखी आधारावरून हा पोवाडा केला आहे.

म. फुले हे पदवीधर नव्हते, संशोधक नव्हते. भाषाशास्त्रज्ञ नव्हते पण ते बहुश्रुत होते. मूलगामी विचारवंत होते. अवतारवादाची कल्पना त्यांना निर्मूलन करावयाची होती. म. फुले हे दलितांचे कैवारी, मानवी मूल्यांचे पुजारी, समतेचे उपासक, स्त्रियांचे रक्षणकर्ते, शेतकरी कामकरी-कामकरी वर्गांचे उद्धारकर्ते होते. त्यामुळे ते आधुनिक भारताचे पहिले 'महात्मा' ठरले आहेत.'' असे सार्थ उद्‌गार धनंजय कीर यांनी काढले आहेत.[३]

**संदर्भ :**


१) श्री. प्रा. डॉ. बा. ह. कल्याणकर - महात्मा फुले यांचा गौरवग्रंथ म. फुले जन्मशताब्दी प्रकाशन, जुलै १९८२, पृ. क्र. २६६.

२) डॉ. एस. एस. भोसले - पूर्णा - ऑगस्ट १९८१- लेख-साहित्यिक महात्मा फुले - भंगलेल्या समाजाचे प्रबोधन.

३) धनंजय कीर - महात्मा ज्योतीराव फुले आमच्या समाजक्रांतीचे जनक, प्रथम आवृत्ती १९६८, पृ. क्र. २५६.





**प्रा. डॉ. अशोक भीमराम शिंदे**
मराठी विभाग प्रमुख
श्री ज्ञानेश्वर महाविद्यालय, नेवासे. दूरभाष : ९८८१४०४४२

# संयुक्त महाराष्ट्र लढ्याच्या समूहमनाचे आत्मदर्शन – 'हुतात्मा' – मीना देशपांडे

- सौ. अमृता खाकुर्डीकर

देश-प्रदेशांच्या सीमा जिंकण्यासाठी आणि राज्यांचे विस्तार वाढवण्यासाठी राजे-महाराजे यांनी वर्षानुवर्षे चालवलेल्या अनेकानेक लढाया किंवा घनघोर युद्धाच्या कहाण्यांनी भारताच्या इतिहासाची पाने रंगली आहेत. या युद्धखुणा अभिमानाने अंगावर मिरवत काळ पुढे पुढे जात राहातो; आणि त्या पाठोपाठ इतिहास आपल्या पाऊलखुणा उमटवत जातो. राजे-महाराजे यांचा काळ संपला. लोकशाही राज्य आलं तरी लढाया संपल्या नाहीत. नवे संघर्ष, नव्या लढायांचे इतिहास घडवू लागले. असाच अलिकडच्या काळात एक धगधगता इतिहास घडला. लोकशाही राज्यातल्या भाषावार प्रांत रचनेच्या मुद्यावरून संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या रुपाने पडलेल्या ठिणगीने पेट घेतला. पेटलेल्या या होमकुंडात उडी घेऊन हौतात्म्य पत्करलेल्या बलीदानींच्या पुण्याईने अखेर विजयाचा जो इतिहास लिहिला, त्याचीच फळे आपण सर्व महाराष्ट्रवासी आज आनंदाने चाखीत आहोत. परंतु या आनंदाच्या पार्श्वभूमीशी असलेल्या रक्तरंजित इतिहासाची वेदनामय आठवण जागी करणारी, या संपूर्ण लढ्याचा प्रवास ज्या अवघड वळणा-वळणांनी पूर्ण झाला, त्या वैचारिक आणि भावनिक हिंदोळ्याची सर्व नोंद तपशीलानिशी घेऊन तात्कालीन समूहमनाचे आत्मदर्शी अंतरंग उलगडणारी मीना देशपांडे लिखित 'हुतात्मा' ही कादंबरी संयुक्त महाराष्ट्र राज्य निर्मितीच्या सुवर्ण महोत्सवाचे निमित्त साधून वाचकांपुढे सादर झाली आहे.




एका ज्वलंत सामाजिक इतिहासाची पार्श्वभूमी लाभलेल्या या कादंबरीचा पट मोठा विस्तीर्ण आहे. मुख्य पात्रे काल्पनिक असली तरी घटना आणि प्रसंगाचे वास्तव संदर्भ या पात्रांच्या पलीकडे जाऊन वास्तवाचा जिवंत अवकाश निर्माण करतात. तत्कालीन संघर्षगाथेच्या नेतृत्वभागी असलेल्या सेनापती बापट, कॉम्रेड डांगे, एस. एम. जोशी, आचार्य अत्रे, प्रबोधनकार ठाकरे या समितीतल्या लढवय्या सदस्यांबरोबरच या लढ्यात महत्त्वाची आणि निर्णायक भूमिका निभावणारे चिंतामणराव देशमुख, शंकरराव देव, काकासाहेब गाडगीळ, यशवंतराव चव्हाण, भाऊसाहेब हिरे, स. का. पाटील, बाळासाहेब खेर, मोरारजी देसाई आणि पंडित नेहरू, ही प्रत्यक्षातील व्यक्तीचित्रे या कादंबरीला एक निराळाच उठाव आणतात. वास्तव इतिहासातील सत्य व्यक्तिरेखांबरोबर वाचकांचा प्रवास सहजपणे सुरू होतो आणि या भल्या लांबलचक घटनाक्रमाच्या साखळीत वाचक अलगदपणे अधिकाधिक गुंतत जातो. संयुक्त महाराष्ट्रासाठी आंदोलने करणाऱ्या जनतेच्या समूह भावनेशी एकरूप होतो. हा परिणाम जसा मांडणीचा आहे; तसाच तो लेखिकेने कादंबरीच्या सुरवातीला लिहिलेल्या पूर्वपीठिकेचाही आहे. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र प्राप्तीच्या या चळवळीचे तत्कालीन वर्तमान संदर्भ पिंजून लिहिलेले हे माहितीपूर्ण निवेदन, ज्ञात-अज्ञात घटनांचे संदर्भ उलगडून कादंबरीच्या आकलनास खूपच सहाय्य करते. या पूर्वपीठिकेच्या रुपाने लेखिकेने सांगितलेला तपशील नव्या पिढीला यथोचित माहिती पुरवणारा एक महत्त्वपूर्ण दस्तऐवजच झाला असल्याने त्याचे स्वतंत्र असेही मोल आहे.

३० एप्रिल १९६० च्या मध्यरात्री संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनिमित्त जल्लोष करणाऱ्या मुंबापुरीच्या वर्णनाने कादंबरीचा प्रारंभ होतो. विद्युत्



अनुक्रमणिका

नावाच्या तरुणीच्या मनात त्या ऐतिहासिक क्षणी दाटून आलेल्या विविध भाव-भावनांची आंदोलने टिपत टिपत निवेदन हळुवारपणे गतकाळात शिरते.

या गतकाळात विद्युत्‌चे कुटुंबिय तर आहेतच पण याशिवाय तिला काही न काही निमित्ताने भेटलेल्या अनेक व्यक्ती आहेत. त्यामध्ये कम्युनिस्ट तरुण नेता अभय साने, तरुण पत्रकार श्रीरंग पत्की, सामाजिक कार्यकर्त्या मालनीताई, समाजवादी कार्यकर्ता अवधूत, चळवळीतील कार्यकर्त्या तरुणी श्यामा आणि सुगंधा. ॲडव्होकेट गंगाधर माने, कामगारांचा पुढारी गुरूनाथ नाईक या सर्व पात्रांच्या भोवती कथानक गुंफताना या प्रत्येक पात्राच्या उपकथानकाचे धागेही लेखिकेने विणले आहेत. या एक एक व्यक्तिरेखेच्या माध्यमातून संयुक्त महाराष्ट्र चळवळीत सहभागी असलेल्या प्रत्येक गटाचा एक एक प्रतिनिधी अशी चपखल पात्रयोजना केल्यामुळे कादंबरीच्या या विस्तीर्ण विषयाचा डोलारा समतोलपण उभा करणे शक्य झाले आहे. कथानकामध्ये या प्रत्येक व्यक्तिरेखेचा चळवळीशी प्रत्यक्ष संबंध दाखवलेला आहे. प्रत्येकाचे कादंबरीतील स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे.

याच पात्रांच्या माध्यमातून साधारणतः ऑगस्ट १९५५ ते १९६० हा संपूर्ण कालपट सलगपणे एखाद्या चलत्‌ चित्रपटासारखा पुढे पुढे सरकला आहे. सत्याग्रह, संप, मोर्चे या शांततामय आणि लोकशाही पद्धतीने लोकांनी आपुलकीने आणि आस्थेने सोडवला जाईल, या आशेने केलेल्या हक्कांच्या मागणीला सत्ताधारी स्वकीय नेतृत्त्वाने अत्याचार करून युद्धाचे भीषण रूप दिले आणि अनेक निरपराध जीवांची यात होळी झाली. जखमा, अपंगत्व, घरादाराची राखरांगोळी, जेल, जेलमधले अत्याचार, मृत्यू यांच्या हाहाःकाराचे किती एक करुण हुंकार काळाच्या पोटात दडले. त्या सर्वांना या कादंबरीने पुन्हा एक उद्‌गार दिला आहे.

**कादंबरीतील व्यक्तिरेखा :**

कादंबरीच्या सुरवातीलाच वाचकांच्या भेटीला आलेला अभय साने हा कम्युनिस्ट नेते कॉम्रेड डांगे यांचा सच्चा भक्त आहे. कॉ. श्रीपाद अमृत डांगे यांना कम्युनिस्ट कार्यकर्ते 'डी' म्हणत. अभय सानेला 'डी'च्या नेतृत्वाबद्दल प्रचंड अभिमान. मुंबईच्या लाखो कामगारांवर अत्यंत प्रभाव असलेला झुंजार नेता म्हणून डांगेंनी संयुक्त महाराष्ट्र चळवळीमध्ये महत्त्वपूर्ण भूमिका निभावली. मुंबईचा समावेश महाराष्ट्रात व्हावा; आणि स्वतंत्र महाराष्ट्र राज्य निर्माण व्हावे म्हणून त्या वेळच्या सर्वपक्षीय नेत्यांनी एकत्र येऊन संयुक्त महाराष्ट्र परिषदेची स्थापना करून या समितीमार्फत मुंबईसह स्वतंत्र महाराष्ट्र प्राप्तीचा हा लढा मोठ्या ताकदीने लढवला. या समितीचे नेतृत्व डांगे यांनी कामगारशक्तीच्या जोरावर आणि कम्युनिस्ट कार्यकर्त्यांच्या बळावर हिंमतीने निभावले. मुंबई महाराष्ट्रातून वगळून तिचे केंद्रशासित राज्य झाले तर मुंबईतील गिरण्यांमध्ये काम करणाऱ्या महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यातून आणि विशेषतः कोकणातून आलेल्या गरीब कामगारांचा रोजगार हातातून जाईल, त्यांच्या जागी केंद्राने उत्तरप्रदेशी भय्ये आणि बिहारी यांना कामावर ठेवले तर इथला कामगार देशोधडीला लागेल असा तर्क करून डांगेंनी मुंबई महाराष्ट्रातच रहावी; या हेतूने सर्वपक्षीय समितीचे नेतृत्व पत्करून संयुक्त महाराष्ट्र चळवळीचा लढा जोरदारपणे लढवला. या समितीच्या माध्यमातून आखण्यात आलेले विविध सत्याग्रह, मोर्चे, संप आणि त्यासाठी डांगेंनी कामगारांना घातलेली साद आणि कामगारांनी लाखोंच्या संख्येने जीवाची, नोकरीची पर्वा न करता दिलेला प्रतिसाद या सर्व गोष्टींचं विवेचन अभय सानेच्या वर्तन व्यवहारातून, त्याच्या भोवती असलेल्या वेगवेगळ्या कारखान्यातल्या कामगारांच्या छोट्यामोठ्या नेत्यांशी झालेल्या संवादातून, विशिष्ट हॉटेलमध्ये असलेला त्याचा अड्डा आणि त्या अड्ड्यावर जमणारी त्याची माणसं, मित्र-परिवार यांच्या माध्यमातून स्पष्ट करण्यात आलं आहे. सोनेरी काड्यांच्या चष्म्यातून निळ्या घाऱ्या डोळ्यांनी समोरच्या माणसाच्या मनाचा ठाव घेणारा, अत्यंत हुशार, जपून, मोजकंच बोलणारा आणि कम्युनिझमच्या तत्त्वांवर मनापासून प्रेम करतानाच कामगारांमध्ये आपला पुरेपूर वाचक बसवणारा अभय साने हा त्या काळच्या कम्युनिस्ट तरुण नेत्यांचा योग्य प्रतिनिधी वाटतो. त्याचं सुगंधा, श्यामा या चळवळीत काम करणाऱ्या तरुणींशी असणारं मैत्र, विद्युत्‌शी ओळख झाल्यानंतर तिला समजून घेण्याचा त्याचा प्रयत्न,

तिच्या वाया गेलेल्या भावाचं आयुष्य वाचवण्यासाठीचे त्याचे प्रयत्न, समाजवादी चळवळीतील समविचारी तरुण अवधूतशी असलेली त्याची वैचारिक जवळीक या सगळ्या गोष्टींमधील वारकाव्यांमुळे अभय सानेची व्यक्तिरेखा नीट उभी राहिली आहे. चळवळींच्या कामांना प्राधान्य देणारा तत्त्वनिष्ठ अभय श्रीरंग पत्कीसारख्या सामान्य वार्ताहराशी सहेतुक स्नेह ठेवतो, तेव्हा अधिकच चलाख वाटतो. म्हणूनच अभय· साने ही कादंबरीतील महत्त्वाची व्यक्तिरेखा आहे.

श्रीरंग पत्की हा 'जनहित' या वर्तमानपत्रात नुकताच वार्ताहर म्हणून लागलेला असून संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीतील सर्व घटनांचा साक्षीदार आहे. सुरुवातीला भीत भीत वावरणारा, एका सत्याग्रहात पोलिसी कार्यवाहीमध्ये गोळी लागून त्याच्या शेजारीच मृत्युमुखी पडलेल्या कोवळ्या तरुणाच्या मृत्यूने धक्का बसलेला, राजकारणातल्या थोर नेत्यांच्या स्वार्थी राजकीय डावपेचांनी थक्क होणारा श्रीरंग शेवटी मात्र एक मुरलेला पत्रकार होतो. त्याच्यासमोर संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचा एवढा धगधगता ज्वालामुखी पेटलेला असूनसुद्धा त्याच्यावर काहीही परिणाम होत नाही. त्यातली तीव्रता समजून घेण्याची बौद्धिक किंवा वैचारिक कुवत त्याच्यामध्ये नाही. चळवळीत जीवाचं रान करणारी सर्वसामान्य माणसं, महिला यांच्यापासून त्याच्या मनात कुठल्याच प्रेरणा जाग्या होत नाहीत. उलट स्वार्थ त्याला चांगलाच कळायला लागतो. स्वतःची नोकरी आणिं त्यातली बढती या गोष्टी मिळवण्यासाठी आपल्या वृत्तपत्राला हव्या त्या बातम्या काढण्यात तो तरबेज होतो. त्यामानाने त्याच्याबरोबर काम करणारा छायाचित्रकार कांबळी जास्त प्रामाणिक वाटतो. तर एकेकाळी श्रीरंग ज्यांना गुरुस्थानी मानत असतो, असे नाना दावतर हे ध्येयवादी उपसंपादक वेळ येताच नोकरीवर लाथ मारून राजीनामा देऊन निघून जाताता, त्याला कारणीभूतही श्रीरंगच असतो, सुरुवातीला विद्युत्ला मदत करणारा, आधार देणारा श्रीरंग पुढे मात्र बदलत जातो. श्यामासारख्या पुढारलेल्या मनमोकळ्या मुलीबरोबर मैत्री ठेवून विद्युत्सारख्या साध्या-सरळ मुलीशी लग्न करण्याचा कावेबाज विचार करणारा श्रीरंग तत्त्वशून्य पोटार्थी पत्रकाराचा अचूक प्रतिनिधी आहे.

'वारा' या आद्याक्षरी नावाने वृत्तपत्रसृष्टीत प्रसिद्ध असलेले जनहितचे संपादक, हे श्रीरंग पत्कीचे बॉस. जनहितची मालकी एका सत्ताधारी पक्षधार्जिण्या सेठकडे असते. त्यामुळे 'वारा' आपल्या संपादक पदाची नोकरी मालकाच्या इशाऱ्यानुसार करताना सत्ताधारी पक्षाची भलावण करण्यातच लेखणी खर्ची घालत असतात. सत्ताधारी पक्षाच्या लोकप्रिय नेत्यांनी कितीही चुकीचे धोरणात्मक निर्णय घेतले तरी वारा मात्र त्यांची अग्रलेखातून स्तुतीच करीत राहातात. वारांकडे सत्ताधारी पक्षातील प्रभावी नेत्यांची उठवस असते. त्यांच्याकडून पक्षांतर्गत गटबाजीच्या बातम्या धूर्तपणे काढून त्याचा उपयोग ते आपल्या मर्जीतल्या नेत्यांच्या समर्थनार्थ करीत असतात. वास्तविक नेत्यांची चुकीची बाजूही बरोबरच दाखवण्याची त्यांची पत्रनीती ही चळवळीला मारक ठरत असते. अर्थात् वारांना त्याच्याशी काही देणेघेणे नाही. भांडवलदारांच्या वृत्तपत्रात संपादकपदी मिरवणाऱ्या, तत्त्वा-वित्त्वाची न पेलवणारी अवघड भानगड करण्यापेक्षा इमाने-इतबारे धन्याची चाकरी करून सुखात जगणाऱ्या बुद्धिजीवी पत्रकाराचे प्रतिबिंब वारांच्या व्यक्तिरेखेत तंतोतंत उतरले आहे.

वारांचं एक मित्रमंडळ आहे. समाजातल्या लब्ध प्रतिष्ठांचं असं हे वर्तुळ रोज एका श्रीमंत उद्योगपतीच्या घरी जमून उंची मद्याच्या जोडीने काव्यशास्त्रविनोद करीत असतं. एक प्रसिद्ध कादंबरीकार, एक प्रतिष्ठित डॉक्टर, एक प्रसिद्ध ॲडव्होकेट आणि वारांच्या रुपाने एक प्रसिद्ध संपादक. अशा या मित्रमंडळात अवतीभोवतीच्या परिस्थितीवर, सद्यस्थितीतल्या राजकारणावर, राजकीय नेत्यांच्या वर्तनावर आणि विशेषतः संयुक्त महाराष्ट्र चळवळीवर चर्चा झडत असतात. अर्थात् या चार जणांची मद्यबैठक एक असली तरी तात्त्विक बैठक मात्र निरनिराळी असल्याने त्यांच्या चर्चेला वादाचे स्वरूप असते. डॉक्टर हे काहीसे तत्त्वनिष्ठ व समाजाबद्दल कळवळा असणारे गृहस्थ आहेत. त्यांना संयुक्त महाराष्ट्र चळवळीबद्दलही आस्था आहे. चळवळीचं वैचारिक नेतृत्व करणारे आचार्य अत्रे हे त्यांचं लाडकं व्यक्तिमत्त्व आहे.

म्हणूनच जखमी झालेल्या सत्याग्रहींसाठी औषधोपचार करायला ते धावून जातात. त्याउलट इतर सर्व बाकीचं मित्र मंडळ आहे. यातले कादंबरीकार माधवराव यांना संयुक्त महाराष्ट्राचा लढा निरर्थक वाटतो आहे. वारा संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीसाठी एकत्र आलेल्या विविध पक्षांच्या नेत्यांमध्ये फूट पडण्याचं भाकीत वारंवार करण्यात स्वतःला धन्य समजणाऱ्यांपैकी असल्याने एकूणच या विरोधी सुरांमधून रंगणारी इथली चर्चा म्हणजे तत्कालीन बुद्धिजीवी उच्च प्रतिष्ठित पुरुषवर्गाची जीवनदृष्टी आणि जगण्याची शैली दर्शवीत असून त्यांनी केलेली टीका-टिप्पी ही या विशिष्ट वर्गाच्या वैचारिक भूमिकेची प्रातिनिधिक मांडणीच म्हणावी लागेल.

या प्रतिष्ठित मित्रमंडळीत ॲडव्होकेट गंगाधर माने यांचाही प्रवेश झालेला असतो. पण माने या सर्वांपेक्षा वरेच वेगळे आहेत. त्यांना चळवळीविषयी आपुलकी आहे. या लढ्यात सरकारने अन्यायाने सामान्य जनतेवर केलेल्या अत्याचाराची त्यांना चीड आहे. म्हणूनच ते अन्यायग्रस्त लोकांचा माहिती अहवाल तयार करून त्यांना कायदेशीर मदत करण्यासाठी, त्यांच्यावरील खटले मोफत चालवण्यासाठी, जेलमधल्या सत्याग्रहींना सोडवण्यासाठी झटत असतात. विद्युत्लाही ते आर्थिक मदत व्हावी, या दृष्टीने कामावर ठेवून घेतात. जमेल तसं सामाजिक कार्यही तिच्याकडून करून घेतात. तिच्या घरी जाऊन तिच्या कुटुंबाशी तुटलेले संबंध जुळवून देतात; आणि पुढे जेव्हा विद्युत् या मृदुभाषी, मदतशील, संयमी, प्रगल्भ अशा माणसाच्या प्रेमात पडते तेव्हा ते अतिशय हळुवारपणे तिची चूक तिला समजावून देतात. सुगंधा या लोभस आणि शूर क्रांतिकारक मुलीशी त्यांचा पूर्वीपासून स्नेह असतो. त्यांच्या आईच्या आग्रहावरून ते लवकरच सुगंधाशी विवाहबद्ध होणार असतात. ही गोष्ट ते विद्युत्‌ला स्पष्ट सांगून प्रेम, मैत्री, आदर या भावनांमधली गुंतागुंत नीट समजावून सांगून तिच्याशी कायमचं मैत्रीचं नातंही बांधून घेतात. पुढे त्यांचा नाना दावतर या समविचारी उपसंपादकाशी स्नेह जुळतो. गंगाधर माने ही या कादंबरीत एक मस्त जमून आलेली व्यक्तिरेखा आहे. प्रथमपासूनच या व्यक्तिरेखेचा चढता आलेख अखेर उंचावत गेला असल्याने मान्यांच्या व्यक्तिमत्त्वाला एक उंची प्राप्त झाली आहे.

नाना दावतर हे सुरुवातीला वारा आणि श्रीरंग यांच्या 'जनहित'मध्ये उपसंपादक पदी काम करीत असतात. संयुक्त महाराष्ट्र चळवळ जेव्हा पेट घेते; त्यावेळी जनतेवर विनाकारण होत असलेल्या अन्यायाने ते अस्वस्थ होतात. अशा प्रसंगी आपण पत्रकार या नात्याने आणि आपल्या वर्तमानपत्राने जनतेच्या बाजूने आपली बांधिलकी मानून अन्यायाला वाचा फोडावी, असे त्यांना वाटत असते. परंतु जनहितसारख्या सत्ताधाऱ्यांचे लांगूलचालन करणाऱ्या वृत्तपत्रात ही गोष्ट शक्यच नसते. शिवाय ही नोकरी सोडली तरी दुसरीकडेही आपल्या मनासारखे काम करता येईल याची खात्री नसल्याने ते आपली नोकरी मनाविरूद्ध पार पाडीत असतात. नंतर मात्र नानांच्या आयुष्यात एक 'टर्निंग-पॉइंट' म्हणता येईल असा क्षण येतो. प्रतापगडावरील नेहरूंच्या सभेत ते मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे अशी घोषणा देतात. लाखोंच्या संख्येने आलेल्या सत्याग्रहींना गडापासून बऱ्याच अंतरावर रोखण्यात आलेले असल्याने सत्याग्रहींचा आवाज नेहरूंपर्यंत पोहचलेलाच नसतो. या गोष्टीचं वैषम्य दाटून आल्यामुळे नाना स्वतःच्याही नकळत अशी घोषणा देऊन बसतात. पंतप्रधानांच्या कडक सुरक्षा व्यवस्थेतील सभेमध्ये हा प्रकार झाला असल्याने पोलीस नानांना एक दिवसाची अटक करतात. हा सर्व प्रकार संपादक वारांच्या कानावर गेल्याने ते त्यांना नोकरीवरून काढून टाकणार त्या ऐवजी नानाच नोकरीचा राजीनामा देऊन चालते होतात. आचार्य अत्रेंच्या कानावरही हा प्रकार जातो. ते मोठ्या कौतुकाने नानांना भेटायला बोलवतात; आणि आपल्या 'मराठा' मध्ये लगेच रूजूही व्हायला सांगतात. त्यानंतर नानांचे अक्षरशः दैवत असलेले आचार्य अत्रे यांचा सहवास त्यांना अगदी जवळून लाभतो. पहाटे अत्र्यांशी समुद्रावर फिरायला जाताना होणारी भेट आणि त्यानंतर अत्र्यांच्या घरी त्यांच्यासोबत सकाळचा चहा घेणारे नाना हे अत्र्यांच्या परीसस्पर्शाने स्वतःच्या आयुष्याचं सोनं झालं असं मानत असतात, ते वाचकांनाही पटतं. या सर्व जडणघडणीत नानांमधला पत्रकार एका

ध्येयवादाची वाट चालत राहातो. अत्र्यांशी होणाऱ्या त्यांच्या चर्चेचा या माध्यमातून वाचकांना संयुक्त लढ्याच्या त्या काळातील अत्र्यांच्या मनात चाललेल्या उलघालीचे जवळून दर्शन घडत; ते नाना दावतरांच्या माध्यमातून. त्याअर्थाने नाना दावतर ही व्यक्तिरेखा कादंबरीत फारच महत्त्वाची ठरली आहे.

मालिनीताई या मुंबईतच्या गिरणगावातल्या कामगार वसाहतीत महिलांमध्ये काम करणाऱ्या एक सामाजिक कार्यकर्त्या. या कामगार स्त्रियांचे आरोग्यविषयक, आर्थिक, कौटुंबिक, सामाजिक प्रश्न सोडवण्यात त्यांचा पुढाकार असतो. समाजकार्याची आवड असणाऱ्या इंदिराबाई, शरदिनी या आणखी काही महिलांच्या मदतीने मालुताईंनी समता महिला मंडळ स्थापन करून या कामगार स्त्रियांमध्ये जागृती करण्याचं काम हाती घेतलेलं होतं. मंडळाची साप्ताहिक बैठक कधी आपल्या घरी, कधी कामगार वस्तीतल्या एखाद्या घरी आयोजित करून त्या त्यांना वर्तमानपत्र वाचून दाखविणे, विविध घडामोडींवर त्यांच्यात चर्चा घडवून आणणे असे त्याच्या कामाचे स्वरूप होते. पण पुढे जेव्हा संयुक्त महाराष्ट्राची चळवळ उभी राहिली; तेव्हा याच समता महिला मंडळाने अत्यंत महत्त्वाची जबाबदारी पार पाडून सत्याग्रहामध्ये मोलाचा सहभाग दिला.

मुंबई, प्रतापगड, दिल्ली, गुजरात, बेळगाव अशा सर्वच पेटलेल्या ठिकाणी मालुताईच्या नेतृत्वाखाली महिलांनी धडाकेबाज कामगिरी नोंदवली. कामगार वस्तीतल्या भिमाबाई नाईक, शांताबाई, राधाबाई या सर्व स्त्रियांमध्ये मुंबईसह महाराष्ट्र स्वतंत्र होण्याची प्रेरणा निर्माण करताना त्यांच्या सोबत कामगार वस्तीत काम करणाऱ्या कम्युनिस्ट कार्यकर्त्या श्यामा आणि सुगंधाही असत. श्यामा, सुगंधा, शरदिनी यांना समजून घेऊन त्यांच्याकडून संघटनेचं काम हुशारीने करून घेणाऱ्या, एस.एम. जोशींच्या नेतृत्त्वाखाली सुरू असलेल्या समाजवादी चळवळींची, समाजवाद्यांनी लोकशाहीत स्वीकारलेल्या राजकीय मूल्यांची जपणूक करण्याचा, संयुक्त महाराष्ट्र चळवळीत कर्तव्यभावनेनं उतरण्याचा मालुताईंचा प्रयत्न म्हणजे त्याकाळातील कोणत्याही समाजवादी चळवळीतील स्त्रीचं रूप प्रतिबिंबित करणारा आहे. त्यांचा समंजसपणा, प्रगल्भता, शांत वृत्ती कामगार स्त्रियांबाबत व त्यांच्या मुलाबाळांबाबत त्यांना वाटणारी करुणा या सर्व बाबी म्हणजे त्या वेळच्या बुद्धिजीवी मध्यमवर्गीय महिलांमध्ये असलेल्या सामाजिक बांधिलकीतून आपल्याला झेपेल ते सामाजिक कार्य करण्याच्या भावनेचं हे प्रातिनिधिक रूपच म्हणायला हवं. विद्युत्‌ला तिच्या कौटुंबिक अडचणीच्या काळात आधार देऊन आपल्या घरी ठेवून घेणाऱ्या; तिची नोकरी, लग्न याबाबतीत मदत करू इच्छिणाऱ्या मालुताई या खऱ्या अर्थाने सर्व स्त्रियांच्या हितचिंतक वाटतात.

विद्युत् ही गरीब घरातली, कौटुंबिक समस्यांनी ग्रस्त असलेली सर्वसामान्य तरुणी ही या कादंबरीतली मध्यवर्ती व्यक्तिरेखा. वास्तविक समूह मनाची स्पंदनं टिपणाऱ्या सदरच्या महाराष्ट्राची चळवळ हीच अथवा नायिका नाही. काळ हाच या कथानकाचा नायक आहे आणि संयुक्त महाराष्ट्राची चळवळ हीच नायिका आहे. म्हणूनच विद्युत् या कादंबरीची नायिका होऊ शकली नाही. तिच्या सरळ रेषेतील आयुष्याभोवती परिस्थिती आणि काळ यांचा अजब गुंता तयार झाला आहे. संयुक्त महाराष्ट्र चळवळीसारखी जनतेनं चालवलेली आणि जिंकलेली चळवळ तिच्या अवतीभवती घडत राहते. परिस्थितीच्या रेट्याने ती त्यामध्ये ओढली जाते, इतकंच. बाकी या व्यक्तिरेखेमध्ये या महाकथानकाची महानायिका होण्याचा योग असूनही तिला मात्र ते भाग्य मिळालेलं नाही. वास्तविक सुगंधा सारखी गोव्याच्या स्वातंत्र्य लढ्यात पोर्तुगीज सरकारविरूद्ध तेजस्वीपणे लढलेली क्रांतीकारक तरुणी, श्यामासारखी कम्युनिस्ट विचारांच्या जाज्वल्य प्रेरणेने कामगार वस्तीत धडाडीने कार्य करणारी धाडसी तरुणी, समाजकार्याला मनोभावे वाहून घेतलेल्या मालूताई, तडफदार कॉम्रेड नेता अभय साने, वर्तमानाचं आपल्या कुवतीनुसार भान जपणारा श्रीरंग, विद्यमान परिस्थितीशी दोन हात करून शांतपणे आपलं ठरलेलं काम करणारे आणि सदैव तिला मदतीचा हात देणारे ॲड. माने या सर्व प्रभावी व्यक्तींचा सहवास घडूनही विद्युत्‌मध्ये स्वसामर्थ्य वाढवण्याची ताकद निर्माण होत नाही. कधी आपल्या कौटुंबिक, आर्थिक परिस्थितीने



अनुक्रमणिका

तर कधी भाऊ अखिलेशच्या मवालीगिरीने, कधी मालुताईंच्या नकळत वाटणाऱ्या दबावाने ती सदैव घायाळ होत राहते. स्वतःला आक्रसून घेते. कधी अभय सानेबद्दलचं आकर्षण, कधी श्रीरंगशी आधारासाठी साधलेली जवळीक आणि अखेर ॲड. मानेंच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल वाटलेली ओढ यांच्या भावनिक गुंतवळ्यातून तिला स्वतःला शेवटपर्यंत सोडवता आलेलं नाही. कारण नसता आणि संबंध नसता अखिलेशची जबाबदारी अभय सानेवर टाकून आणि त्याबद्दल त्याला दोषी धरून तिने स्वतःचं परावलंबित्वच जपलं आहे. मधूनच कधीतरी ती चळवळीबद्दल आपुलकी निर्माण होऊन काही करू पाहते; पण त्यात फारसा जीव नाही. तिची कोणतीच कृती चळवळीला भरीव मदत करणारी नाही. त्यामानाने काही काळासाठी येऊन जाणारी लीला कुंभार सारखी तरुणी वाचकांच्या कायम लक्षात राहाते. रॉड्रीक्स या सैन्यातील देखण्या तरुणाबद्दल तिला आकर्षण वाटलं असलं तरीं ती त्या प्रेमाचा स्वीकार करणे जाणीवपूर्वक आणि विचारपूर्वक नाकारते. प्रेम-बीमाच्या भावुकतेपेक्षा तिच्या मनाला समाजकार्याची खरीखुरी तळमळ लागलेली आहे. आपली ही आस पूर्ण करणे तिला सर्वांत महत्त्वाचे वाटते. तिने विद्युत्‌ला ज्याप्रकारे प्रेम प्रकरणाकडे पहायला शिकवलं; त्यावरून अगदी वैयक्तिक स्वरूपाच्या आणि खरं तर कित्येकदा तात्पुरत्या काळासाठी आयुष्यात येणाऱ्या प्रेमाच्या वादळाला शांतपणे तोंड देण्याचा तिचा प्रयत्न, हे तिच्या वैचारिकतेची उंची दाखवते. खरं तर अशा नायिकेची फक्त चळवळीतल्या सामाजिक कार्यालाच नव्हे तर मराठी साहित्यालाही फार गरज आहे, असे वाटते.

याच सर्व व्यक्तीचित्रांमध्ये आपल्या मध्यवर्ती व्यक्तिरेखेच्या म्हणजे विद्युत्‌च्या आयुष्याची नकारात्मक पार्श्वभूमी रंगवणारी पात्रेही आहेत, तिचे खडूस, कटकटे वडील, संतापी स्वभावाची चिडखोर आई, किशोरवयातच शाळेला राम राम ठोकून टप्पोरेगिरी करत फिरणारा लहान भाऊ अखिलेश. तिच्या जीवनाची उदासवाणी बाजू या पात्रांमुळे अधोरेखित झाली आहे. शेवटी मात्र अखिलेश कर्नाटक सीमावादाच्या चळवळीत त्याच्या समवयस्क कम्युनिस्ट कार्यकर्त्यांबरोबर ओढला जातो आणि मृत्यू पावतो. विद्युत्‌च्या मनाला त्याचं हे मरण म्हणजे चळवळीसाठीचं शहीद होणं, असे वाटून चटका लावून जातं. मात्र हा चटका वाचकांना फारसा बसलेला नाही. अखिलेशच्या मृत्युला शहीद म्हणण्याइतकी उंची प्राप्त झालेली नाही. कारण त्याच्या शहीद होण्याला कोणताही प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष पुरावा नाही. विद्युत्‌ला तशी शंका आली तरी वाचकांना त्याची खात्री पटत नाही. तसा ठोस पुरावा जर दिला गेला असता तर हौतात्म्याचा रंग अधिक गहिरा झाला असता.

**आशय आणि अभिव्यक्ती :**

संयुक्त महाराष्ट्र चळवळीमध्ये प्रत्यक्षात घडून गेलेल्या घटना आणि पात्रांचा इतिहास कादंबरीच्या फॉर्ममध्ये सांगण्याचं आव्हान स्वीकारून लेखिकेने या संपूर्ण सत्यकथनाचा आशय एकाचवेळी दोन पातळ्यांवर मांडला आहे. प्रत्यक्षातील व्यक्तिमत्त्वे आणि त्यांच्या प्रत्यक्ष व्यवहारातील वर्तनाचे वास्तव, ही एक पातळी आहे; तर कथानकात उभ्या केलेल्या काल्पनिक पात्रांच्या माध्यमातून निर्माण झालेलं कादंबरीगत वास्तव ही दुसरी पातळी. फाउंटन चौक, अभय सानेचा उडपी हॉटेलवरचा अड्डा, वारांचं जनहित वर्तमानपत्राचं कार्यालय, वारा आणि मित्र परिवाराची रोजची बैठक, मालुताईंचे घर, कामगार वस्तीतील भीमाबाईचं घर, अभयची साने आणि त्याचे कॉम्रेड यांची चाळीतली ती खोली, विद्युत्‌चं चाळीतलं घर, ॲड. मानेचं ऑफीस, दिल्लीतील आंदोलन, प्रतापगडावरील सत्याग्रहींची गर्दी. ही स्थळं आणि तिथले पात्रांचे व्यवहार, संवाद, चर्चा, या सर्वांनी मिळून काळाचा पट घट्ट धरून ठेवल्याने हा दुपदरी मेळ सुरेख जमला आहे. अतिशय कौशल्याने काळाला जिवंत करण्याचं अवघड काम लेखिकेने ताकदीने केलेलं आहे.

पात्रांच्या भावभावनांची विविध रूपं चळवळीतील घटनांशी जोडत जोडत समांतरपणे जात असताना वाचकही याच समांतर रेघेवरून वेगाने चालत राहतो. अभिव्यक्तीची अशी तरलता हेच या कादंबरीचं



अनुक्रमणिका

बलस्थान आहे. अन्यथा इतिहासातील घटनांची नीरस चर्पटपंजिरी होण्याची या विषयाला मोठीच भीती होती. या कादंबरीचं मुख्य प्रयोजन आहे ते संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या इतिहासाचं सत्यकथन. इतिहासाचा हा वारसा लेखिकेने अचूक सांभाळून पुढच्या पिढीच्या हाती दिला आहे.

लेखिका मीना देशपांडे या चळवळीतील अग्रणी नेते आचार्य अत्रे यांची कन्या आहेत. त्या अर्थाने घरच्याच माणसाने सांगितलेल्या या कथनाला तथ्यांचं मोल आपोआपच लाभलं आहे. हे करताना लेखिकेनं निवेदक या नात्याने जे तटस्थपण जपायला हवं होतं तेही अतिशय कसोशीने जपलं आहे. स्वतःचे वडीलच हा इतिहास घडवणाऱ्या नायकांपैकी एक असूनही लेखिकेने कुठेही आपपर भाव ठेवलेला नाही. जे सत्य आहे ते जसंच्या तसंच सांगणं हे एखादं व्रत निभावण्यासारखंच होतं.

महात्मा गांधी, पंडित नेहरू, सरदार वल्लभ पटेल हे भारतातील थोर पुरुष. त्यांच्याबद्दल वारंवार उल्लेख येणं या कथनात अपरिहार्य होतं. त्याचप्रमाणे नेहरूंची कन्या इंदिरा गांधी आणि सरदार पटेलांचे पुत्र डाह्याभाई पटेल, मोरारजी देसाई आणि यशवंतराव चव्हाण किंवा विठ्ठलराव गाडगीळ या सर्वांचीच चित्रणे बाईंनी धाडसाने केली आहेत. या सर्व नेत्यांमध्ये एक सुखद धक्का देऊन गेले आहेत, ते इंदिरा गांधीचे पती फिरोज गांधी. दिल्लीतील सत्याग्रहींना त्यांनी दाखविलेली माणुसकी ही खरीच असावी, असे त्यांच्या कुठेतरी क्वचितच दिसणाऱ्या हसऱ्या फोटोतून सांडताना दिसते.

भारताचे लाडके पंतप्रधान पंडित नेहरू यांचं जनमानसावर अधिराज्य. परंतु या इतिहासाची शोकांतिका म्हणजे या थोर संवेदनशील नेत्याची सहानुभूती संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला मात्र मिळाली नाही. खरे तर स्वतंत्र भारताच्या नव्या लोकशाही राज्याने भाषावार प्रांतरचना हे तत्त्व स्वीकारल्यानंतर मराठी भाषिकांचा महाराष्ट्र आणि गुजराती भाषिकांचा गुजरात होणं हे तत्त्वाला धरून असतानाही नेहरूंनी द्विभाषिक राज्याचा आग्रह इतका का लावून धरला असेल, औद्योगिकीकरणावर नेहरूंचं प्रेम जगजाहीर आहे. मुंबई शहर हे त्यावर सत्ता राहाणार नाही, असा तर्क नेहरूंनी कशाच्या आधारे केला असेल? महाराष्ट्रातील मराठी भाषिक नेत्यांनी केंद्र सरकारात आपला मराठीचा मुद्दा लावून धरण्यात कोणता कमीपणा मानला? परकी सत्तेनं जनतेवर जुलूम करावेत तसे आपल्याच लोकशाही राज्यातील आपल्याच स्वकीयांविरूद्ध असं घनघोर अत्याचारी युद्ध हे आधुनिक राजे-महाराजे का लढले? या सर्वच प्रश्नांची वाचकांच्या मनात घर करण्यास या कादंबरीनं भाग पाडलं आहे. या सर्व प्रश्नांची माहीत असलेली उत्तरं अवघड आहेत. या अवघड प्रश्नांनी एका वेदनामय इतिहासाला जन्म दिला. निरपराधांना विनाकारण मृत्यू दिला. हेच सत्य खाली उरलं आहे.

प्रभावी नेत्यांचे नेतृत्वही निष्प्रभ वाटावे असे अतुलनीय धैर्य दाखवले ते सर्वसामान्य दुबळ्या माणसांने, हे सत्य अधोरेखित करण्याची कामगिरी या कादंबरीने चोख बजावली आहे. तत्कालीन राजकारण, समाजकारण, पत्रकारिता या सर्वांचा वेध घेताना लेखिकेने केलेला अभ्यास, संदर्भशोध आणि भूतकाळाचा समाजकारण, पत्रकारिता या सर्वांचा वेध घेताना लेखिकेने केलेला अभ्यास, संदर्भशोध आणि भूतकाळाचा पडदा सारून घेतलेला इतिहासाचा धांडोळा, यामुळे या कादंबरीचं मोल अनमोल आहे.

रवीमुकुल यांच्या मुखपृष्ठ्याने खोल गंभीर परिणाम देणारा आशय व्यक्त केला आहे तर मॅजेस्टिकने या दर्जेदार पुस्तकाच्या निमित्ताने मराठी साहित्यात एक भरीव निर्मितीची भर घातली आहे.

❖❖❖

लेखिका -मीना देशपांडे, प्रकाशक : अशोक कोठावळे
मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस, न्यू गर्ल्स स्कूलसमोर, राम मारूती रोड
ठाणे (प.) ४०० ०११, किंमत : ४५० रुपये

**सौ. अमृता खाकुर्डीकर**
२९/६८३, निलज्योती हौऊसिंग सोसायटी,
गोखलेनगर, पुणे १६. फोन : २५६६२४७२
amruta.khakurdikar@gmail.com



अनुक्रमणिका

वाचकांची निवड

# तीन लक्षवेधी पुस्तके

- डॉ. मुकुला कुलकर्णी

*[ प्रत्येक वाचक आपल्या परीने मनोमन समीक्षा जरी नव्हे; तरी आस्वादक टीका-टिपणी करीतच असतो, लेखक-समीक्षक आणि वाचक हे वाचनसंस्कृतीचे तीन आविभाज्य घटक आहेत. त्यापैकी वाचकाला बोलते करण्यासाठी 'वाचकांची निवड' हे एक पानी सदर सुरू करण्यात येत आहे. समीक्षा वाचकाभिमुख करण्यासाठी याचा उपयोग व्हावा, ही अपेक्षा. - संपादक ]*

वाचता वाचता काही पुस्तकं मनात घर करून बसतात. त्यांच्यातील पात्रांशी एक नातं तयार होतं. वेगळ्या वाटा जोखलेली, वास्तवाचं अचूक चित्रण केलेली, मला भावलेली ही तीन पुस्तके प्रत्येक मराठी माणसाने वाचावीत अशीच आहेत.

**टु द लास्ट बुलेट** : अशोक कामटे यांची जीवनकहाणी, वीरपत्नी विनीता कामटे आणि विनीता देशमुख, अनुवाद : भगवान दातार.

२६ नोव्हेंबर २००८ साली मुंबईवर झालेल्या अतिरेक्यांच्या हल्ल्यामध्ये अशोक कामटे यांना वीरमरण प्राप्त झाले. त्यांच्याबरोबर हेमंत करकरे आणि विजय साळसकर हेही हुतात्मा झाले. त्या रात्री नक्की काय घडलं ? अतिरेक्यांवर प्रतिहल्ला करण्यासाठी या अधिकाऱ्यांनी नक्की कोणत्या योजना आखल्या होत्या? याचं गांभीर्य ओळखून सैन्याला पाचारण करण्याचा संदेश देऊनही सैन्य उशिरा दाखल झाले. यामागची कारणं शोधण्यासाठी वनिता कामटे या अशोक कामटे यांच्या पत्नीने केलेले प्रयत्न हृदयस्पर्शी आहेत. त्याला शब्दबद्ध करण्यासाठी वनिता देशमुख यांनीही मदत केलेली आहे. मूळ इंग्रजीत असलेल्या या पुस्तकाचा मराठी अनुवाद भगवान दातार यांनी केला आहे.

अशोक कामटे हे एक कर्तव्यदक्ष पोलीस अधिकारी होते. आपल्या प्रत्येक पोस्टींगच्या ठिकाणी त्यांनी आपला वेगळा ठसा निर्माण केलेला होता. याबरोबरच त्यांची एक दिलदार व्यक्ती म्हणून असणारी विविध रूपे या पुस्तकात पहायला मिळतात. एका पत्नीने आपल्या पतीविषयी हे पुस्तक लिहिले असल्याने त्याला एक वेगळेच परिमाण लाभले आहे

हे पुस्तक वाचताना जशी बऱ्याच प्रश्नांची उत्तरे मिळतात. तसेच नवे प्रश्नही उपस्थित होतात. (अमेय प्रकाशन, पुणे, किंमत रु. १९२/-)

**'फिरंग ढंग : शरद वर्दे**

जागतिकीकरणामुळे परदेश प्रवास नवीन राहिलेला नाही. वेगवेगळ्या रंगांच्या आणि उंचीच्या माणसांशी जेव्हा आपला संपर्क येतो; तेव्हा साहजिकच त्यांच्या स्वभावाविषयीच कुतूहल जागृत होतं. प्रस्तुत पुस्तकामध्ये शरद वर्दे यांनी त्यांच्या संपर्कातील सहा परदेशी व्यक्तिमत्त्वाचा वेध घेतलेला आहे. त्यापैकी महागुरू कोहेन डोळ्यात झणझणीत अंजन घालतो तर लंकाश्री सनथ कुमारसिंघे मनाला भावतो.

अनेक भावस्पर्शी घटनांमधून ही व्यक्तिमत्त्वं उलगडत जातात आणि आपल्याला वेगळ्याच वैचारिक पातळीवर नेऊन ठेवतात. लेखकाची प्रभावी लेखनशैली पुस्तकाच्या शेवटच्या पानापर्यंत उत्कंठा वाढवत नेते. (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, किंमत रु. २५०/-)

**हेड हंटर : सुमेध वडावाला (रिसबूड)**

एखाद्या उद्योग समुहाचे भवितव्य हे त्याच्या प्रमुखाच्या कार्यक्षमतेवर अवलंबून असते. सुयोग्य प्रमुखाचा शोध घेण्याचं काम करतो. 'हेड हंटर'. भारतामध्ये ही संकल्पना सध्या नव्याने रुजत आहे. गिरीश टिळक हे हेड हंटर आहेत. सुस्थापित नोकरी सोडून हेड हंटर बनण्याचा त्यांचा प्रवास रंजक आहे. तसेच औषध कंपन्यांमधील त्यांचे अनुभवही वेगळेपणा दर्शवितात. प्रत्येक कंपनीची गरज ओळखून त्यानुसार योग्य व्यक्तीच्या निवडीसाठी करावी लागणारी व्यूहरचना, त्यातील चढउतार खाजगी कंपन्यांमधील स्पर्धेची जवळून ओळख करून देतात. (राजहंस प्रकाशन प्रा.लि. पुणे, किंमत रु.२००/-)

❖❖❖

डॉ. मुकुला कुलकर्णी
वेदान्त सोसायटी, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

## निवडक नवे...

परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी
विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा
परिचय करून देणारे सदर




**'मराठी नाटकातील शोकांतिकेचा नवप्रवाह' :**

डॉ. संध्या टिळक यांचा हा प्रबंध पुस्तकरुपाने प्रकाशित करण्यात आलेला आहे. भरत मुनींनी आपल्या 'नाट्यशास्त्र' या ग्रंथात रंगभूमीवर शोकनाट्य सादर का करू नयेत, याविषयीचे सविस्तर विवेचन केले आहे. पण बदलत्या परिस्थितीनुसार, जागतिक पातळीवरही बरीच उलथापालथ झाली. त्याचा झंझावात थेट आपल्या उंबरठ्यापर्यंत येऊन पोहोचला. त्यामुळे या साऱ्याचे पडसाद मराठी रंगभूमीवर प्रत्यक्ष-अप्रत्यक्षरित्या उमटणे अपरिहार्य होते. त्यातूनच रंगभूमी अधिक वास्तववादी बनत गेली. जीवनातील राजकीय, सामाजिक, कौटुंबिक पातळीवरील शोकांतिका रंगभूमीवर येत राहिल्या. यातूनच निर्माण झाला शोकांतिकेचा नवप्रवाह. या प्रवाहाचा वेध या लेखनाद्वारे लेखिकेने घेतला आहे. या प्रवाहातून निर्माण झालेल्या सशक्त नाट्यपरंपरेचे अवलोकनही याद्वारे होते आहे. शोकान्त नाटकांची निर्मिती, मराठी नाटकातून जाणवलेली शोकांतिका, मराठी नाटकातील बदलते प्रवाह, सामाजिक नाटके, १९७० नंतरचा तेंडुलकर ते मतकरी प्रवास, नवीन शोकांतिका-संकल्पनांचे विस्तृत विवेचन अशा विविध पैलूंच्या आधारे लेखिकेने अत्यंत अभ्यासपूर्ण रीतीने या नवप्रवाहाचा वेध घेतला आहे. (मराठी नाटकातील शोकांतिकेचा नवप्रवाह, लेखिका - डॉ. संध्या टिळक, प्रकाशक- शारदा प्रकाशन, नौपाडा, ठाणे, पृष्ठे - १७८, मूल्य रु. २५०-)

**'नॉट ओन्ली पोटेल्स' :**




यशस्वी उद्योजकांच्या यशोगाथा आजवर अनेक जणांनी लिहिल्या आहेत. त्यातील बारकावे, अनेक अडथळ्यांची शर्यत पार करीत या उद्योजकांनी मिळवलेले यश, या बाबी अनेकांसाठी प्रेरणादायी ठरल्या आहेत. अशाच चार उद्योजकांची यशोगाथा शोभा बोंद्रे यांनी यामध्ये लिहिली आहे. तरीही यामध्ये एक वेगळेपण आहे. उद्योग व्यवसायाच्या क्षेत्रात गुजराथी माणसं मोठ्या प्रमाणात असतात; आणि हमखास यशस्वी होतानाही दिसतात. भारताप्रमाणेच परदेशातही हे चित्र आढळते. अमेरिकेत 'मोटेल्स्' ही स्वस्त आणि मस्त राहण्याची सोय बऱ्याचदा हायवेच्या कडेला उपलब्ध असते. ही छोटीशी, टुमदार घरे अनेक दृष्टींनी सोयीचीही असतात. हा व्यवसाय चालविणाऱ्यांमध्ये अनेक 'पटेल' आहेत. म्हणून आता लोकांनी या मोटेल्सना नाव दिले 'पोटेल्स'. अशा अमेरिकास्थित तीन पटेल आणि एक शाह अशा चार जणांच्या प्रेरणादायी कथा यामध्ये समाविष्ट केलेल्या आहेत. प्रत्येकाचे बिझनेस वेगळ्या धर्तीचे आहेत. तसेच यशाचं शिखर गाठण्याचा प्रत्येकाचा मार्गही वेगळा आहे. या सत्यकथा मनोरंजक, वाचनीय आहेत तशाच मार्गदर्शकही आहेत, हे निश्चित ! (नॉट ओन्ली पोटेल्स, लेखिका - शोभा बोंद्रे, प्रकाशक - मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस, पृष्ठे - २२८, मूल्य रु. २५०/-)

**अथा तो ज्ञानजिज्ञासा - भाग १ :**

डॉ. यशवंत रायकर यांचे हे पुस्तक म्हणजे खऱ्या अर्थाने ज्ञानपिपासूंसाठी मेजवानी आहे. काहीतरी नवे शोधण्याचा, जाणून घेण्याचा ध्यास माणसामध्ये असतोच. अनेक वेळा प्रस्थापित उत्तरांनी ज्यांचे समाधान होत

**अथा तो ज्ञानजिज्ञासा**

**भाग १**

**डॉ. यशवंत रायकर**

**मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई**

नाही, ते शंका उपस्थित करतात. नव्या प्रेरणेने शोध घेत राहतात. त्यासाठी अस्वस्थही होतात. या धडपडीचा मोबदला काय, याचा विचार ते करत नाहीत. या 'निरपेक्ष जिज्ञासेमुळेच अनेक ज्ञानक्षेत्रे विस्तारली, कला-संस्कृतीची प्रगती झाली.हे ध्क्षानात घेऊन वैचारिक संस्कृती जोपासण्यासाठी जिज्ञासेची प्रेरणा हा केंद्रबिंदू धरून केलेले हे लेखन आहे. 'नवशक्ती'च्या पुरवणीमध्ये प्रकाशित झालेल्या लेखांचे हे संकलन आहे. या पहिल्या भागात भारताचा प्राकृतिक आणि सांस्कृतिक क्षेत्रांच्या अंगांद्वारे विचार केला आहे. त्यामध्ये भारतीयांचे वांशिक आणि भाषिक भेद, मोसमी पावसाचा इतिहास, आर्य कोण होते ?, ब्रह्मपुत्रेचा शोध, महाभारताचा शोध, चाणक्याचे अर्थशास्त्र, सप्तद्वीप म्हणजे काय, भारतातील निग्रो अशा वैविध्यपूर्ण विषयांवरील ४४ लेखांचा त्यामध्ये समावेश आहे. वाचकांच्या मनातील जिज्ञासा शमविणारे हे उद्‌बोधक लेखन आहे. (अथा तो ज्ञानजिज्ञासा- भाग १ : लेखक- डॉ. यशवंत रायकर, प्रकाशक - मॅजेस्टिक प्रकाशन, पृष्ठे - १६२, मूल्य रु. २००/-)

**मनोगती :**




ज्येष्ठ मानसोपचार तज्ज्ञ डॉ. आनंद नाडकर्णी यांच्या 'साप्ताहिक सकाळ' मधील लेखांचे संकलन या पुस्तकाद्वारे केले आहे. डॉ. अल्बर्ट एलिस या मानसशास्त्रज्ञाची विवेकनिष्ठ मानसोपचार पद्धती आणि महाराष्ट्रातील संतसाहित्य यांच्यामधील साम्यस्थळे या विषयाचा पीएच्.डी.च्या निमित्ताने वैद्यकीय व्यावसायिक असलेल्या लेखकाने सखोल अभ्यास केला. त्यातून उतरलेले हे लेखन आहे. मानसोपचार आणि संतसाहित्य हे दोन्हीही विषय स्वतंत्रपणे कळायला आणि आकळायलाही तसे सोपे नसले तरी 'मनोगती'चे लेखन मात्र अत्यंत सहज. लालित्यपूर्ण झाले आहे. नेमक्या भाषेत, नेटक्या शैलीत त्यातील प्रासादिकता जपत ते उतरले असल्याने सर्वसामान्य वाचकालाही ते निश्चितच जवळचे वाटेल. मनातले भूत आणि मनातला देव, विकासाच्या वाटेवर, मीच का सापडतो 'स्ट्रेस'च्या तावडीत ?, घटना, टेन्शन आणि दृष्टिकोन, विवेक आणि स्वधर्म असे काही लेख वैशिष्ट्यपूर्ण आहेत. (मनोगती - लेखक - डॉ. आनंद नाडकर्णी, प्रकाशक - मॅजेस्टिक प्रकाशन, पृष्ठे - १६, मूल्य रु. २००/-)




**'व्यंकटेश माडगूळकर : लेखक आणि माणूस' :**

व्यंकटेश माडगूळकर या समर्थ लेखक-कलावंताबद्दल आणि त्यांच्यातल्या अस्सल माणसाविषयी अनेक मान्यवरांनी वेळोवेळी लिहिले आहे. त्यातील निवडक ३६ लेखांचे संकलन या पुस्तकामध्ये त्यांच्या कन्या ज्ञानदा नाईक यांनी केले आहे. त्यामध्ये समावेश असलेले सर्वच लेखक मान्यवर आहेत. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, रवींद्र पिंगे, शंकर पाटील, जयवंत दळवी, विद्याधर पुंडलिक या माडगूळकर यांच्या समकालीन लेखक मित्रांचे लेख, म. द. हातकणंगलेकर, रा. ग. जाधव, डॉ. गो. मा. पवार, सुधीर रसाळ, डॉ. भा. व्यं. गिरिधारी अशा समीक्षकांचे लेख तसेच अरुणा ढेरे, विनय हर्डीकर, रविमुकुल, शशी पटवर्धन, महावीर जोंधळे अशा त्यावेळच्या तरुण लेखकांचे लेखही यामध्ये समाविष्ट केलेले आहेत. माधव गडकरी यांनी 'गोमंतक' मध्ये लिहिलेला लेखही यामध्ये आहे. या सर्व लेखांमधून तात्यांच्या स्वभावाचे आणि व्यक्तिमत्त्वाचे अनेक पदर हळुवारपणे उलगडत जातात.त्यांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते. त्यांच्यातला प्रतिभावंत क्षणोक्षणी, पानोपानी प्रत्ययाला येतो. 'शेती हा व्यवसाय नाही, तर जीवनपद्धती

आहे.' असा मूलगामी विचार करणारा त्यांच्यात दडलेला विचारवंत भेटतो. आणि जीवनावर मनसोक्त प्रेम करणारा, त्याच्याबरोबर न जाता जीवनाला स्वतःबरोबर घेऊन जाणारा एक अस्सल माणूसही भेटतो. लेखनाप्रमाणेच बांधणी, मांडणी, मुखपृष्ठ या सर्वच बाबतीत पुस्तक उजवे ठरले आहे.(व्यंकटेश माडगूळकर : लेखक आणि माणूस, संपादन : ज्ञानदा नाईक, प्रकाशक : अनुबंध प्रकाशन, पृष्ठे - २२४, मूल्य रु. १८५-/)




**'पाच-तीन-दोन' :**

लेखिका-प्रकाशिका डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांचा हा आठवा कथासंग्रह. या कथासंग्रहामध्ये तेरा कथांचा समावेश आहे. या सर्व कथा स्त्रीव्यक्तिरेखांभोवती फिरतात. आजच्या महाराष्ट्रीय स्त्रीचे बहुतेक पैलू त्यामधून प्रकटलेले आहेत. परंपरागत स्त्रीरूपे जशी त्यामध्ये आहेत. त्याचप्रमाणे घटस्फोटासाठी कायदेशीर लढाई करणारी, लग्नाशिवाय एखाद्या पुरुषाबरोबर राहणारी अशी बदलत्या परिस्थितीमुळे निर्माण झालेली स्त्रीरूपेही त्यामध्ये आहेत. या कथांमधलं वातावरण, पात्रं आणि कथानकही शहरी आहेत. पण या पांढरपेशा समाजातही अनेक ठिकाणी भावसंबंध जपले जात असल्याचे आणि माणुसकीचा ओलावा कायम असल्याचे प्रत्यंतर काही ठिकाणी येते. कथांची रचना साधी, सोपी, सरळ आहे. त्यामुळे त्या आपल्या आजुबाजूला घडत असल्यासारख्या वाटतात आणि मनाला भिडतात. (पाच-तीन-दोन : लेखिका- डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, प्रकाशक- अनुबंध प्रकाशन, पृष्ठे - १८०, मूल्य रु. १६०/-)

**रानजाई :**



लेखिका सुमन चव्हाण यांचा हा पहिलाच ललितलेख संग्रह. वयाची सत्तरी ओलांडल्यानंतर त्यांनी केलेले हे लेखन आहे. त्यामुळे वयोपरत्वे आलेला परिपक्व दृष्टिकोन त्यामध्ये आहे. मात्र बालपणापासूनचे अनुभव, निसर्गाच्या सान्निध्यात वाढताना, जगताना टिपलेल्या, भावलेल्या अनेक बाबी मांडताना बालपणीचे मनातले कुतूहल, निरागसपणही लेखनात डोकावल्याखेरीज राहात नाही. त्यामुळे हे लेखन अधिक जिवंत, सरस ठरते; आणि मनाला स्पर्शून जाते. 'जुईचे स्वप्न', 'रानजाई', 'मोठी आई', 'हिरवाई', 'नाचण-चिकी', 'चानी', 'ऋणमुक्त' हे लेख या दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण म्हणावे लागतील. निसर्गाची ओढ आणि भूतकाळाचे आकर्षण ही आपली वैशिष्ट्ये जपत सहृदय लेखिका आपले निसर्गाशी असलेले अनुबंध आपल्या शैलीत व्यक्त करतात. त्यामुळे यातील प्रत्येकच लेख प्रत्ययकारी झाला आहे. लेखिकेचे आचार-विचार, चिंतन-मनन, निरीक्षण या साऱ्याला प्रासादिक शैलीची जोड लाभल्याने लेखन चित्रमय तरीही प्रगल्भ झाले आहे. (रानजाई : लेखिका-सुमन चव्हाण, प्रकाशन-तारा एज्युकेशनल चॅरिटेबल ट्रस्ट, पृष्ठे ९६, मूल्य रु. १५०/-)




**'समकालीन साहित्यचर्चा' :**

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले हे मराठीतील कथाकार, कादंबरीकार आणि समीक्षक या नात्याने सर्वांना ज्ञात आहेत. तीव्र सामाजिक जाणिवा असणारे आणि गंभीरतापूर्वक लेखन करणारे एक हाडाचे शिक्षक म्हणून ही त्यांची खास ओळख आहे. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुखपद भूषविणाऱ्या डॉ. कोत्तापल्लेंनी औरंगाबादच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरूपदही भूषविले. त्याची कुलगुरूपदाची कारकीर्द संपत असताना 'समकालीन साहित्यचर्चा' हा त्यांचा गौरवग्रंथ डॉ. मनोहर जाधव आणि डॉ. श्रीकांत देशमुख यांनी संपादित

केला आहे. समकालीन मराठी साहित्याची विविध अंगाने या ग्रंथात चर्चा केलेली आहे. मान्यवरांच्या लेखाने सजलेल्या या ग्रंथात डॉ. कोत्तापल्ले यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू उलगडून दाखविणारेही लेख आहेत. वाङ्मयाच्या अभ्यासकांसाठी उपयुक्त ठरेल असाच हा ग्रंथ आहे. (डॉ. नागनाथ कोत्तापल्ले गौरवग्रंथ - समकालीन साहित्यचर्चा. संपादक : मनोहर जाधव आणि श्रीकांत देशमुख, प्रकाशक- प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५४४, क्रिंमत रु. ७००/-)




**विसाव्या शतकातील गाजलेले दहा वृत्तपत्र संपादक :**

विसाव्या शतकावर महाराष्ट्रातील मराठी वृत्तपत्र संपादकांचा एक ठसा उमटलेला आहे. लोकमान्य टिळक, न. चिं. केळकर, आचार्य अत्रे, ग. त्र्यं. माडखोलकर, प्रभाकर पाध्ये, नानासाहेब परूळेकर, गोविंदराव तळवलकर, माधवराव गडकरी, अनंतराव भालेराव, चं. प. तथा बापूसाहेब भिशीकर, या मान्यवर संपादकांचा त्यात मोलाचा वाटा आहे. या संपादकांच्या पत्रकारितेच्या क्षेत्रातील कर्तृत्वाविषयी अनिल बळेल यांनी 'विसाव्या शतकातील गाजलेले दहा वृत्तपत्र संपादक' या ग्रंथात सविस्तरपणे लिहिले आहे. पुढच्या पिढीला या व्यक्तींचे योगदान समजावे अशा भूमिकेतून हे लेखन केले आहे. केवळ वृत्तपत्र विद्याशाखेचे शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनाच नव्हे तर सर्वांना उपयुक्त ठरेल असा हा ग्रंथ आहे. (विसाव्या शतकातील गाजलेले दहा वृत्तपत्र संपादक- लेखक : अनिल बळेल, प्रकाशक : स्नेहल प्रकाशन, पृष्ठे १९५, किंमत रु. १७५/-)

**नापास मुलांचे प्रगती पुस्तक :**




परीक्षेतील गुण म्हणजे गुणवत्ता ही संकल्पना मानगुटीवर बसल्यामुळे नापास होणारी मुले नेहमीच टाकावू म्हणून दुर्लक्षिली जातात. पण शाळेतल्या परीक्षेत नापास होणाऱ्या मुलांनी पुढच्या आयुष्यात डोंगराएवढे काम करून आपले कर्तृत्व सिद्ध केले. अनेकदा जगण्याच्या परीक्षेत पास होऊन ही मुले आपल्या कर्तृत्वाची मुद्रा कालपटलावर उमटवितात. परीक्षेत अपयश आलेल्या पण पुढील जीवनात यशस्वी झालेल्या अशा विद्यार्थ्यांविषयी 'नापास मुलांचे प्रगतीपुस्तक' या ग्रंथात जे काही वाचायला मिळते त्यातून निराशा तर दूर पळतेच पण स्फूर्तीही मिळते. या पुस्तकाचे संपादन अरुण शेवते यांनी केले आहे. व्ही. शांताराम, नेल्सन मंडेला, अमिताभ बच्चन, न्यूटन, किशोरी आमोणकर, बाबासाहेब पुरंदरे, डॉ. श्रीराम लागू, देवानंद, शाहरूख खान, अच्युत पालव, डॉ. अनिल अवचट या मोठ्या माणसांनाही परीक्षेत अपयश आले. पण जीवनाच्या परीक्षेत ते यशस्वी झाले. त्यांची ही कर्तृत्वगाथा निश्चितच जीवनाला नवी दिशा देणारी आहे. (नापास मुलांचे प्रगतीपुस्तक - संपादन- अरुण शेवते, ऋतुरंग प्रकाशन, पृष्ठे २४०, किंमत रु. २२५/-)




**संवाद-आस्वाद :**

एखादे पुस्तक आवडल्यानंतर फारतर त्या विषयीचा अभिप्राय आपण मित्रांजवळ व्यक्त करतो. समीक्षा लेख लिहिण्याची संधी मिळाली तर लेखक समीक्षालेख लिहितात. 'संवाद-आस्वाद' या ग्रंथात लेखक मधु जामकर यांनी एक अभिनव प्रयोग केला आहे. त्यांनी थेट लेखकांना सविस्तर पत्रे लिहून वाङ्मयीन हितगुज केले आहे. या पत्रातून साहित्यकृतीचे अंतरंग उलगडत जाते. वाचकांनाही एका वेगळ्या पातळीवर साहित्यकृतीचा आस्वाद घेतल्याचा आनंद मिळतो. डॉ. न. गो. राजूरकर,

दासू वैद्य, डॉ. द. ना. धनागरे, सुनीताबाई देशपांडे, राम शेवाळकर, प्रा. रा. रं. बोराडे, व. पु. काळे, द. भि. कुलकर्णी या आणि अशा अनेक मान्यवरांशी केलेला हा पत्रव्यवहार आहे. संवाद आस्वादाचा हा अभिनव प्रयोग साहित्याच्या अभ्यासकांना आणि वाचकांना भावेल असाच आहे. (संवाद-आस्वाद : लेखक- मधु जामकर, परममित्र पब्लिकेशन्स, ठाणे, पृष्ठे : १२२, किंमत रु. १२५/-)




**संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात शाहिरांचे योगदान :**

संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचा सुवर्णमहोत्सव नुकताच साजरा झाला. या लढ्यासाठी महाराष्ट्रातील शाहिरांनी महत्त्वपूर्ण योगदान दिले. त्यांच्या शाहिरी-कर्तृत्वाची नोंद डॉ. माधव पोतदार यांनी 'संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात शाहिरांचे योगदान' या ग्रंथात घेतली आहे. शाहिरी प्रवाह कृती आणि उक्ती असा एक अभ्यासपूर्ण लेख या ग्रंथात आहे. शाहीर अमरशेख, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे, शाहीर महर्षी आत्माराम पाटील, शाहीर कृष्णराव साबळे, शाहीर विश्वासराव फाटे, शाहीर अजीज नदाफ, शाहीर जंगम स्वामी, मनमाडचा शाहीर चकोर, शाहीर चंदू भरडकर, शाहीर लीलाधर हेगडे, शाहीर विठ्ठल उमप, शाहीर पी. बी. पाटील, शाहीर शेख जैनू चाँद या शाहिरांच्या कर्तृत्वाची गाथा डॉ. माधव पोतदार यांनी रसाळ शैलीत मांडली आहे. या ग्रंथातून संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचा इतिहास उलगडत जातो. अभ्यासकांना उपयुक्त ठरेल असाच हा ग्रंथ आहे. (संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात शाहिरांचे योगदान : लेखक- माधव पोतदार, अनुबंध प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७८, किंमत रु. १६०/-)

**पोशिंद्याची कविता :**




'पोशिंद्याची कविता' हा डॉ. गजानन जाधव यांनी संपादित केलेला ग्रामीण कवितांचा संग्रह आहे. बुलढाण्याच्या पैलू प्रकाशनाने तो प्रकाशित केला आहे. या कवितासंग्रहास डॉ. द. ता. भोसले यांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना लाभली आहे. 'शेतकऱ्यांचे काबाडकष्ट, त्यांचे दुःख, शोषण आणि प्राक्तन त्यांना बदलत्या परिस्थितीत येऊ लागलेले आत्मभान आणि त्यातून घडणारी त्यांची विद्रोही मानसिकता ही आशयसूत्रे महत्त्वाची मानून डॉ. गजानन जाधव यांनी या संग्रहाचे संपादन केले आहे, त्यामुळे प्रस्तुतग्रंथाला विशेष महत्त्व आहे.' अशा शब्दात डॉ. एस. एम. कानडजे यांनी या ग्रंथाचा गौरव केला आहे. पोशिंद्याच्या बदलत गेलेल्या कवितेचेही प्रतिबिंब या संग्रहात आहे. (पोशिंद्याची कविता : संपादक- डॉ. गजानन जाधव, पैलू प्रकाशन, बुलढाणा, पृष्ठे ११२, किंमत रु. १००/-)




**ती आणि मी :**

'ती आणि मी' हे उद्योगपती भवरलाल जैन यांचे आत्मकथन आहे. 'खानदेशातल्या एका लहानशा खेड्यात नेकीने जगणाऱ्या कष्टाळू मारवाडी कुटुंबाची पारंपरिक घडी विस्कटू न देता भवरलाल व त्यांच्या पत्नी कांताबाई या नव्या पिढीच्या जोडप्याने या संपूर्ण परिवाराला यशाच्या उत्तुंग शिखरावर नेले, हे आपल्या एकूण देशाच्या गतिमानतेचे मानचित्र ठरेल असे तेजस्वी उदाहरण आहे. पण या प्रगतीसाठी या दोघांनाही किती तारेवरच्या कसरती आयुष्यभर कराव्या लागल्या याचे धावते आणि चटका लावणारे कथन 'ती आणि मी' मध्ये वाचकांना दिसेल.' अशा शब्दात भालचंद्र नेमाडे यांनी या ग्रंथाचा गौरव केला आहे. अतिशय हृद्य असे हे आत्मकथन वाचकांना

भावेल असेच आहे.

(ती आणि मी : लेखक - भवरलाल जैन, मॅजेस्टिक प्रकाशन, पृष्ठे - १९८, किंमत रु. २००/-)




**'गझलप्रसाद' :**

गझलप्रसाद हा प्रसाद कुलकर्णी यांचा गझलसंग्रह स्वरा प्रकाशनने प्रकाशित केलेला आहे. गझल हा एक वेगळी प्रत्ययकारक आविष्कार आहे. तो प्रसाद कुलकर्णी यांना साधला आहे असा अभिप्राय व्यक्त करताना प्रस्तावनेत पं. यशवंत देव म्हणतात- ''गझल लिहिणे हे येऱ्यागबाळ्याचे काम नाही. दोन ओळींचा 'शेर', त्यातल्या आकृतिबंधात नियमांबरोबर एक सजीवता असते. जिवंतपणा असतो. ते कसब प्रसाद कुलकर्णींकडे आहे. या संग्रहातले अनेक शेर लाजबाब आहेत. लयकारीच्या अंगाने या गझला स्वरबद्ध होऊन मैफलीत गायल्या गेल्या तर श्रोत्यांची नक्कीच दाद घेऊन जातील.'' (गझलप्रसाद : प्रसाद कुलकर्णी, स्वरा प्रकाशन, पृष्ठे १४४, किंमत रु. १५०/-)

❖❖❖

स्वाती महाळंक, प्रा. मिलिंद जोशी
पुणे

---












## कार्यवृत्त (१ सप्टेंबर २०१० ते ३० नोव्हेंबर २०१०)

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

**७ सप्टेंबर २०१० : पु. भा. भावे स्मृतिदिन :**

प्रारंभी वसुंधरा पटवर्धन यांना दोन मिनिटे उभे राहून श्रद्धांजली वाहण्यात आली. सूत्रसंचालन व स्वागत प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. डॉ. प्रसाद पिंपळखरे यांचे 'भाव्यांच्या सहवासात' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. देशपांडे यांच्या हस्ते पुष्पगुच्छ व ग्रंथ देऊन प्रमुख व्याख्याते व अध्यक्ष यांचा सत्कार करण्यात आला. श्री. सहस्रबुद्धे श्रीधर यांनी डॉ. प्रसाद पिंपळखरे यांचा परिचय करून दिला. श्री. म. जोशी यांनी अध्यक्षीय समारोप करताना पु. भा. भावे यांच्या आठवणी सांगितल्या. दीपक करंदीकर यांनी आभार मानले. शेवटी काही वेळ पु. भा. भावे यांच्या जीवनातील काही निवडक क्षणचित्रांची चित्रफित दाखविण्यात आली.

**३० सप्टेंबर २०१० : नवं कोरं :**

डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांच्या पाच तीन दोन व सावलीच्या शोधात या दोन पुस्तकावर चर्चा आयोजित करण्यात आली. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. ज्योत्स्ना चांदगुडे यांनी डॉ. कुलकर्णी यांचा परिचय करून दिला. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रस्तुत कथासंग्रहाबद्दल आपले मत व्यक्त केले. ज्योत्स्ना चांदगुडे, मीनल बाठे यांनी त्यांच्या काही निवडक कविता सादर केल्यानंतर श्याम भुर्के व स्वाती सामक यांनी त्यांच्या साहित्याबद्दल त्यांच्याशी संवाद केला. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी एकूणच कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**५ ऑक्टोबर २०१० : सत्कार सभा :**

ठाणे येथे डिसेंबर २०१० मध्ये होणाऱ्या ८४व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष उत्तम कांबळे यांचा सत्कार महाराष्ट्र साहित्य परिषद व श्रमिक पत्रकार संघ यांच्या संयुक्त विद्यमाने पत्रकार भवन येथे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते श्रीफल, हार व शाल अर्पण करून झाला. याप्रसंगी व्यासपीठावर ८३ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. द. भि. कुलकर्णी कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे, पत्रकारसंघाचे अध्यक्ष श्याम दौंडकर व संतोष कुलकर्णी हे मान्यवर उपस्थित होते. सूत्रसंचालन प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. प्रास्ताविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. पत्रकार संघाच्या उपाध्यक्ष वसुधा जोशी यांनी श्री. कांबळे यांचा परिचय करून दिला. विविध संस्थांच्या वतीने श्री. कांबळे यांचा गुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. त्यात रंगतसंगत प्रतिष्ठानचे प्रमोद आडकर, सौ. मिथिला आडकर, काव्यविभागाच्या स्वाती सामक, युवा विभागाच्या स्वाती महाळंक, काव्यशिल्पचे सु. वि. पारखी, जयराम देसाई, उद्धव कानडे, सु. वि. जोशी, श्याम भुर्के, निहारा प्रकाशच्या डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, डॉ. निरगुडकर या संस्था व व्यक्तींचा समावेश होता. श्री. दौंडकर, डॉ. प्र. चिं. शेजवलकर, अनंत दीक्षित, अरुण निगवेकर, डॉ. द. भि. कुलकर्णी या वक्त्यांनी आपले विचार प्रकट केले. अध्यक्षीय समारोप प्रा. द. मा. मिरासदार यांनी केला.

**६ ऑक्टोबर २०१० : कै. द. वा. पोतदार स्मृती पुरस्कार वितरण समारंभ :**

'श्रीगणेश : आशियातलं आराध्यदैवत' या श्री. म. के. ढवळीकर लिखित ग्रंथाला यंदाचा हा पुरस्कार भारत इतिहास संशोधक मंडळाचे चिटणीस व या समारंभाचे अध्यक्ष डॉ. श्री. मा. भावे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आले. कार्यवाह स्वाती महाळंक यांनी सूत्रसंचालन केले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी श्री. म. के. ढवळीकर यांचा परिचय करून दिला. पोतदारांच्या स्नुषा शुभलक्ष्मी पोतदार यांचासुद्धा याप्रसंगी सत्कार करण्यात आला. परिक्षक महेश तेंडुलकर यांनी मनोगत व्यक्त केले. यानंतर श्री. म. के. ढवळीकर यांनी आपले विचार प्रकट केले. डॉ. श्री. मा. भावे यांनी अध्यक्षीय समारोप केला. दीपक करंदीकर



अनुक्रमणिका

यांनी आभार मानले.

**९ ऑक्टोबर २०१० : कै. विद्याधर पुंडलीक स्मृतिपुरस्कार प्रदान समारंभ :**

बेळगावच्या सौ. मेधा मराठे यांच्या 'ना. शादीसुदा ना तलाकसुदा' या एकांकिकेला हा पुरस्कार श्रीनिवास भणगे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. कै. पुंडलीक यांचे नातू साहिल पुंडलीक यांनी शारदा स्तवन व पसायदान सादर केले. स्वागत व सूत्रसंचालन कार्यवाह स्वाती महाळंक यांनी केले. डॉ. देशपांडे व डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते अध्यक्ष श्रीनिवास भणगे व रागिणी पुंडलिक यांना पुस्तक देऊन सत्कार करण्यात आला. तसाच परीक्षक बंडा जोशी व डॉ. मधुरा कोरान्ने यांचाही सन्मान करण्यात आला. स्वाती महाळंक यांनी सौ. मेधा मराठे यांचा परिचय करून दिला. परीक्षक बंडा जोशी यांनी आपले मनोगत व्यक्त केले. त्यानंतर पुरस्कारप्राप्त लेखिका सौ. मेधा मराठे यांनी आपले विचार प्रकट केले. श्रीनिवास भणगे यांनी अध्यक्षीय समारोप केला. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**१४ ऑक्टोबर २०१० :**

म. सा. प. ग्रंथालयात प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते सरस्वती पूजन झाले. काही वाचक व कर्मचारी व पदाधिकारी उपस्थित होते.

**१५ ऑक्टोबर २०१० : नाटक विभाग : एकांकिका लेखन स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ :**

नटवर्य श्रीकांत मोघे हे अध्यक्षस्थानी होते. यशस्वी स्पर्धकांना त्यांच्या हस्ते प्रशस्तीपत्रक देऊन गौरविण्यात आले. प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. डॉ. मधुरा कोरान्ने यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. निकाल खालीप्रमाणे :- प्रथम क्रमांक : 'द लॉस्ट बॅटल' : शिरीष देखणे सोलापूर.

द्वितीय क्रमांक : 'आपल्याच शोधात आपण' : प्रा. नितीन देशपांडे, पुणे.

तृतीय क्रमांक : 'द लॉस्ट बेट' : ज्ञानेश्वर जाधवर, पुणे विद्यापीठ

उत्तेजनार्थ : 'दोला' : रजनीश जोशी, सोलापूर.

उत्तेजनार्थ : 'ज्याचं त्याचं नशीब' मृणाल जोशी, पुणे.

प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी श्रीकांत मोघे यांचा पुस्तक व गुलाब देऊन स्वागत केले. यानिमित्ताने श्रीकांत मोघे यांची डॉ. वि. भा. देशपांडे यांनी मुलाखत घेतली.

**२० ऑक्टोबर २०१० : ग्रंथप्रदर्शन व विक्री :**

'पूना बुक फेअर' व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने- 'पूना बुक फेअर'ने आयोजित केलेल्या ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटन मा. डॉ. शां. ब. मुजुमदार यांच्या हस्ते झाले. याप्रसंगी कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे व इतर मान्यवर उपस्थित होते. परिषदेच्या सहकार्याने २१, २२ व २३ ऑक्टोबर २०१० असे तीन दिवस साहित्यविषयक कार्यक्रम सादर करण्यात आले. २१ तारखेला प्रा. द. मा. मिरासदार यांची मुलाखत डॉ. वि. भा. देशपांडे यांनी घेतली.

२२ तारखेला 'कोजागिरी' निमित्त निमंत्रित कवींचे कवीसंमेलन आयोजित केले होते. सहभागी कवी असे होते- घनश्याम धेंडे, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, दीपक करंदीकर, चंद्रकांत वानखेडे, अंजली कुलकर्णी, हेमंत जोगळेकर, कार्यवाह स्वाती महाळंक यांनी सूत्रसंचालन केले.

२३ रोजी 'वाचन संस्कृतीच्या बदलत्या दिशा' या विषयावर चर्चा व संवाद झाला. धनंजय दातार, प्रसाद शिरगावकर, नचिकेत जोशी, संतोष तांबोळी यांच्याशी डॉ. माधवी वैद्य यांनी संवाद साधला.

**२० ऑक्टोबर २०१० : नवं कोरं :**

या उपक्रमांतर्गत शोभा बोंद्रे यांच्या 'नॉट ओन्ली पोटल्स' या मॅजेस्टिक प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या पुस्तकावर चर्चा आयोजित करण्यात आली होती. डॉ. माधवी वैद्य व डॉ. वृषाली पटवर्धन यांनी संवादक म्हणून शोभा बोन्द्रे यांची मुलाखत घेतली.

**१ नोव्हेंबर २०१० :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे एक हितचिंतक अशोक वासुदेव बक्षी यांनी स्वतः बनविलेला वैशिष्ट्यपूर्ण आकाशकंदिल परिषदेच्या मुख्य प्रवेश द्वारासमोर यंदाच्या दिवाळी निमित्ताने छोट्याशा समारंभात



अनुक्रमणिका

लावण्यात आला. कवीवर्य नारायण सुर्वे यांच्या कविता या आकाशकंदिलावर कलापूर्णरित्या प्रदर्शित केल्या होत्या.

**१६ नोव्हेंबर २०१० : संत प्रतिमा प्रदान समारंभ :**

महाकवी कालिदास साहित्य कला संस्कृती संघ, धायरी व सप्तर्षी मित्रमंडळ ज्येष्ठ नागरिक संघ, धायरी, पुणे ४१ या संस्थांकडून महाराष्ट्र साहित्य परिषदेला श्री. विठ्ठल, संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम यांची एकत्रित प्रतिमा, परिषदेच्या कार्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी, वैष्णवी संस्कृतीचे प्रतिक म्हणून प्रदान करण्याचा छोटासा समारंभ आयोजित करण्यात आला होता. या दोन्ही संस्थांचे अध्यक्ष वि. ग. सातपुते, व दोन्ही संस्थांचे सदस्य आणि परिषदेचे पदाधिकारी उपस्थित होते. यावेळी उपस्थितांचा परस्पर परिचयाचा कार्यक्रम पार पडला.

**२९ नोव्हेंबर २०१०० : कवी माधव ज्युलियन स्मृतिदिन :**

यानिमित्ताने भेंडीबाजार घराण्याचे शास्त्रीय संगीत गायक व मराठी गझलगायक शरद करमरकर यांच्या 'शरदाचे चांदणे' ह्या मराठी गझल गायनाचा कार्यक्रम झाला. तबल्याची साथ अरविंद काडगावकर यांनी केली. श्रोत्यांचा प्रतिसाद लाभलेल्या ह्या कार्यक्रमाचे प्रास्ताविक स्वागत आभार प्रदर्शन दीपक करंदीकर यांनी केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे व प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते ज्ञानेश्वरीची प्रत देऊन कलावंतांचा सत्कार करण्यात आला.

❖❖❖

## पिंपरी चिंचवड शाखा

**५ सप्टेंबर २०१० :**

शिक्षक दिनानिमित्त गुरुजनांचा सत्कार व खुले कविसंमेलन आयोजित करण्यात आला होता. प्रा. सौ. सुरेका कटारिया, प्रा. सौ. नूतन आपटे, प्रा. सौ. अंजू सोनवणे, गौतम विधाते या शिक्षकांचा सत्कार मा. महादेव कवतिके (उद्योजक) यांच्या हस्ते व अध्यक्ष राजेंद्र कोरे व विक्रम नवले यांच्या उपस्थितीत करण्यात आला. प्रदीप गांधलीकर यांनी कविसंमेलनाचे परीक्षण केले. प्रथम क्रमांक - श्रीधर पाटील, द्वितीय क्रमांक - आदिती कुलकर्णी, तृतीय क्रमांक अनिकेत सावंत व उत्तेजनार्थ - जान्हवी खोसे, मनमोहन बेवडा यांना घोषित करण्यात आले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष गुलाबराव बिरदवडे यांनी केले.

## कोरेगाव शाखा

**११ ते १५ नोव्हेंबर २०१० : दे. भ. दादासाहेब साखवळकर व्याख्यानमाला :**

असे पाच दिवस प्रि. डॉ. अशोक करांडे विषय :- बडोदा नरेश सयाजीराव गायकवाड, प्रि. डॉ. विजय नलावडे- नवी पिढी व आजचे पालक, अनिल बोधे- शिक्षण कशासाठी व कोणासाठी ?, विठ्ठल माने - 'घडवा स्वतःला', वसंत जोशी- 'ना ह आपटे व त्यांचे समकालीन साहित्यिक' अशा वक्त्यांची विविध विषयांवर व्याख्याने आयोजित करण्यात आली होती. कादंबरीकार ना. ह. आपटे यांच्या ३८व्या स्मृतिदिनानिमित्ताने प्रतिमेस अभिवादन करण्यात आले.

कार्यवाह

❖❖❖

## ठाणे शाखा

**दि. २५ सप्टेंबर २०१० : प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प :** 'संत कवींची मधुरभक्ती' या विषयावर प्रा. डॉ. शरद घाटे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**२० ऑक्टोबर २०१० :**

नवनिर्वाचित अध्यक्ष श्री. उत्तम कांबळे यांचा सत्कार आयोजित करण्यात आला होता.

कार्यवृत्त नोंद :

**दीपक करंदीकर** — स्वीकृत सदस्य, मसाप, पुणे

**डॉ. माधवी वैद्य** — प्रमुख कार्यवाह

# महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा, सोलापूर विभागीय मराठी साहित्य संमेलन

- दत्ता हलसगीकर (अध्यक्ष)

सोलापूर येथे- दि. १३ व १४ नोव्हेंबर २०१० रोजी म. सा. प. सोलापूर शाखेने विभागीय मराठी साहित्य संमेलन भरवले व ते दोन दिवसांच्या भरगच्च कार्यक्रमांनी यशस्वी झाले. हुतात्मा स्मृतिमंदिराच्या कै. निर्मलकुमार फडकुले नगरीत झालेल्या या संमेलनाला रसिक श्रोते व प्रेक्षकांचा उदंड प्रतिसाद मिळाला. कै. त्र्यं. वि. सरदेशमुख सभागृहात संमेलनाचा देखणा सोहळा रसिकांनी अनुभवला.

संमेलनाचे उद्घाटन भारतीय ऊर्जामंत्री ना. सुशीलकुमार शिंदे यांनी मोठ्या उत्साहात केले. आ. प्रणिती शिंदे ह्या स्वागताध्यक्ष तर लोकप्रिय कवी-गीतकार मा. गुलजार हे प्रमुख अतिथी होते. या संमेलनाचे अध्यक्ष होते कवी,लेखक, नाटककार, अनुवादक व ज्येष्ठ समीक्षक मा. निशिकांत ठकार, म. सा. प. सोलापूर शाखेचे अध्यक्ष दत्ता हलसगीकर व संमेलनाचे कार्याध्यक्ष नागेश सुरवसे यांनी या संमेलनाची धुरा सांभाळली होती. चित्रकार शिरीष घाटे यांनी निमंत्रणपत्रिका एवढी सुबकसुंदर तयार केली होती की, ती अ. भा. साहित्य संमेलन वाटावे इतकी अर्थपूर्ण व आकर्षक होती. सोलापूर व परिसरातील सांस्कृतिक भूमी गुणसंपन्न करण्यासाठी आणि लेखन, वाचन, श्रवण संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी म. सा. प. सोलापूर शाखा कार्यरत आहे. हे या पत्रिकेतील विविध कार्यक्रमातून सिद्ध झाले.

संमेलनाच्या उद्घाटनपर भाषणात ना. सुशीलकुमार शिंदे यांनी गुलजार हे प्रमुख पाहुणे म्हणून लाभले याचा आनंद व्यक्त केला. हा कवी 'माणूस' म्हणून खूप मोठा असल्याचे उद्गार काढले. शिंदे पुढे म्हणाले, साहित्य हे समाजमनाचा आरसा असून समाजमनाचे प्रतिबिंब, आशय व दिशा साहित्यात दिसतात. समाजबदलाप्रमाणे साहित्याचा प्रवाह बदलत असतो. आज दलित साहित्याने समाजाचा विचारप्रवाह बदलून टाकला असून जागतिकीकरणाच्या ज्ञानकक्षा रुंदावत आहेत. पण या बदलत्या जगात माणूस माणसापासून दूर चालला आहे. हा संवादाचा सूर हरवता कामा नये.

कथा किंवा शायरी परंपरेपेक्षा मराठी साहित्य संमेलनाची परंपरा अधिक सुंदर व परिणामकारक असून, साहित्यातून समाजाचा प्रकाश मिळतो. साहित्य संमेलनातून प्रकाशवृक्ष दिसतातत. साहित्य समाजाला शीतल छायेबरोबरच प्रकाशाचा मार्ग दाखवतात. स्वतः आग प्राशन करते आणि अंधार अन्याय यासारख्या हानिकारक गोष्टींना जाळते असे प्रतिपादन प्रमुख अतिथी गुलजार यांनी व्यक्त केले. ते म्हणाले, परावर्तित करणाऱ्या पाण्याच्या थेंबाप्रमाणे साहित्याचे वैशिष्ट्य असते. काचेच्या ग्लासात, नदीत किंवा समुद्रात कोठेही पाण्याचा थेंब चमकतो व परावर्तित होतो. त्याप्रमाणेच साहित्य अफाट विश्वात कोठेही चमकत राहाते व दुसऱ्यांना परावर्तित करते. संपूर्ण जीवनाचे सार साहित्यात उतरते. तेच खरे साहित्य असते. देशात व समाजात लोकशाहीप्रधान व्यवस्थित कितीही काही वाईट असले तरी सामान्य माणूस प्रामाणिक असून तोच देशाचा खराखुरा आधार आहे.

संमेलनाध्यक्ष प्रा. निशिकांत ठकार यांनी प्रसारमाध्यमांनी समाजमनाने व संवेदना बोथट केली असून आता साहित्याने संवेदनांना बोथट होऊ न देता त्यात चैतन्य प्राप्त करून देण्याची गरज असल्याचे सांगितले. साहित्यापुढे सध्या मोठे आव्हान प्रसारमाध्यमांचे आहे. पूर्वीचे प्रतिष्ठित वाचक आता चंगळवादी बनले आहेत. त्यांच्या जगण्याच्या अग्रक्रमात बेचैन करणाऱ्या साहित्याचे स्थान खूप घसरले आहे. साक्षरता वाढली म्हणजे वाचनसंस्कृती वाढली असे म्हणण्यासारखी परिस्थिती नाही. सध्या लेखकही वाचकांपेक्षा समीक्षकांना काय वाटेल, पुरस्काराच्या परीक्षकांना काय हवं असते याचा विचार करताना दिसतात. याबद्दल संमेलनाध्यक्षांनी खंत व्यक्त केली. सोलापूरजवळ कुडलसंगम येथील भग्न



अनुक्रमणिका

संगमेश्वर मंदिरातील 'वांछी तो विजयी होईया' असे मराठीत कोरलेला शिलालेख इतिहास संशोधक व तज्ज्ञ आनंद कुंभार यांनी शोधून काढला आहे. ज्ञानेश्वरपूर्व तीनशे वर्षांपूर्वीचा हा मराठीतील पहिला शिलालेख आहे. त्याचे औचित्य साधून या संगमेश्वर परिसरात आगामी काळात अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन घेण्याची सूचनाही प्रा. ठकार यांनी केली.

या संमेलनाचे स्वागत कार्याध्यक्ष नागेश सुरवसे यांनी केले. तर प्रास्ताविक दत्ता हलसगीकर यांनी केले व सोलापुरातील साहित्यिक भूमी किती विविदतेने आज संपन्न आहे हे सांगितले. स्वागताध्यक्ष आ. प्रणि;ती शिंदे यांनी सभागृहातील रसिकांचे व व्यासपीठावरील मान्यवरांचे स्वागत अत्यंत उत्कटतेने व शैलीदार भाषणाने केले. आपली मुलगी एवढे उत्स्फूर्त सुरेख विचार मांडते याचा आनंद होतो असे ना. सुशीलकुमार शिंदे यावेळी म्हणाले. म. सा. प. पुणे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी विभागीय साहित्य संमेलन भरवण्याचा हेतू विषद करताना सांगितले की, अखिल भारतीय साहित्य संमेलनात सर्वच साहित्यिकांना समाविष्ट करून घेणे शक्य नसते. तेव्हा विभागीय संमेलनात ज्या ठिकाणी संमेलन भरते त्या विभागीय परिसरातील लेखक कवींना व्यासपीठ उपलब्ध होऊ शकते व त्यामुळे सांस्कृतिक वातावरण निर्माण होते. वाचनसंस्कृती वाढते आणि ज्यांच्यामध्ये काही स्फुलिंग आहे असे लोक लिहायला लागतात. व्यासपीठावर मान्यवरांवरोबरच पुणे मसापचे व सोलापूर मसापचे पदाधिकारी उपस्थित होते.

उद्घाटन सोहळ्याचे सूत्रसंचालन शोभा बोल्ली यांनी केले; तर मसापचे पुणे प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी यांनी आभार मानले.

दि. १३ रोजी दुपारी 'साठोत्तरी मराठी साहित्याने काय दिले ?' या विषयावर परिसंवाद झाला. अध्यक्षस्थान डॉ. वि. भा. देशपांडे हे तर प्रा. महेंद्र कदम, प्रा. राजशेखर शिंदे, डॉ. सुहास पुजारी व शिरीष देखणे यांनी अनुक्रमे कादंवरी, कविता, आत्मकथन व नाटक या विषयावरील आपले मत अभ्यासपूर्ण रीतीने मांडले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी सर्वसमावेशक असा समारोप केला. प्रास्ताविक प्रा. अर्जुन व्हटकर यांनी केले.

नंतरच्या सत्रात डॉ. गो. मा. पवार यांच्या अध्यक्षतेखाली 'मराठीचे स्थान आणि विकासाच्या दिशा' या विषयावर गंभीरपणे चर्चा झाली. मराठीची काळजी सर्वांनाच आहे. तरीही स्वभाषेतून आपण सर्वोत्तम साहित्य निर्माण करू शकतो आणि यातूनच भाषेचा, साहित्याचा आणि समाजजीवनाचा विकास अपेक्षित आहे. या परिसंवादात डॉ. अ. पां. देशपांडे, लक्ष्मीनारायण बोल्ली, अरुणा खोरे यांनी सहभाग नोंदवला. या महत्त्वाच्या परिसंवादाप्रसंगी सभागृहात उत्सुक श्रोत्यांची गर्दी होती. डॉ. गो. मा. पपवार यांनी वक्त्यांच्या प्रकटनातून आलेल्या विविध पैलूंचा उल्लेख करून मराठीचे स्थान अटळ राहील, असे मत व्यक्त केले. प्रास्ताविक अरविंद जोशी यांनी केले.

दि. १३ रोजी रात्री झालेल्या कविसंमेलनात सोलापूर, पंढरपूर, अकलूज, मोहोळ, करमाळा, पुणे आणि परिसरातील ४० कवींचे बहारदार आणि श्रोत्यांना संतोष देणारे काव्यवाचन झाले. अध्यक्षस्थानी कवी दत्ता हलसगीकर हे होते. याच संमेलनात ऊर्दू, हिंदी, कन्नड व तेलुगु कवींच्या कवितांचा आस्वाद श्रोत्यांना चाखता आला. सूत्रसंचालन मारूती कटकधोंड यांनी केले.

दि. १४ नोव्हेंबर - या संमेलनातील कालचे दोन्ही परिसंवाद साहित्याचे विविध पदर अभ्यासपूर्ण पद्धतीने उद्वोधक ठरले तर 'आजच्या मराठी साहित्यातील स्त्रीदर्शन' हा जिव्हाळ्याचा, चिंतेचा आणि व्यक्तिगत तसेच सामाजिक जीवनाशी निगडित असलेला विषय मोठ्या जबावदारी उलगडला गेला. अध्यक्षस्थानी सांगोल्याचे प्रा. कृष्णा इंगोले हे होते. प्रा. राजेंद्र दास यांनी ग्रामीण साहित्यातील स्त्रीदर्शनाचा आढावा घेतला. तर प्रा. श्रुतीशी वडगबाळकर यांनी गेल्या आत्मचरित्रातील ऐंशी वर्षांतील स्त्री साहित्यातील स्त्री जीवनाची कहाणी कशी आकार घेत गेली, हे सप्रमाण सांगितले. अभिजन साहित्यातील स्त्रीवर्गातील होणारी घुसमट, तिचे सुख-दुःखाचे पदर याचे विश्लेषण प्रा. ऋचा कांबळे यांनी केले. दलित साहित्यातील स्त्रीदर्शनाचा आलेख मांडताना ज्योती वाघमारे आतून



अनुक्रमणिका

प्रसिद्ध झाले...

'मुका फकीर', 'पोळा' नि 'निळ्या हिरव्या तळ्यात' हे तीन कवितासंग्रह आणि 'अरुण' प्रातिनिधिक कवितासंग्रहाच्या संपादनानंतर तब्बल पंधरा वर्षांनी

# तुकाराम खिल्लारे

## यांचे चार कवितासंग्रह




**अशी जिंदगानी**

पृष्ठे संख्या : १५२
किंमत : ₹ १५०/-
मुखपृष्ठ व रेखाटने
देवीदास पेशवे, पुणे




**असे हे माझे हायकू**

पृष्ठे संख्या : १२०
किंमत : ₹ १००/-
मुखपृष्ठ व रेखाटने
धनजंय गोवर्धन, नाशिक




**फुलांच्या बागेत**

पृष्ठे संख्या : ४८
किंमत : ₹ ५०/-
मुखपृष्ठ व रेखाटने
खलील खान, पुणे




**ओवीरूप धम्मपद**

पृष्ठे संख्या : १६०
किंमत : ₹ १५०
मुखपृष्ठ : रवी परांजपे, पुणे
रेखाटने : खलील खान, पुणे
देवीदास पेशवे, पुणे
धनजंय गोवर्धन, नाशिक

कल्पना मुद्रणालय, पुणे यांची मोहक छपाई असलेल्या वरील चार संग्रहांचा ४५०/- रुपयांचा संच रु. ३५०/- मध्ये आमच्या खर्चाने कुरीअरने घरपोच. पुस्तकविक्रेत्यांना ५० टक्के कमिशन म्हणजे रु. २२५/- मध्ये. मागणी नोंदवताच पुस्तके पाठवू. कोणतेही सुटे पुस्तक पाहिजे असल्यास २० टक्के सवलत कपात करून रक्कम पाठवावी.




**पत्रव्यवहाराचा पत्ता**

सौ. सुचिता तुकाराम खिल्लारे
अनुदिन प्रकाशन, ५७, 'पार्वती', गणपती मंदिराजवळ,
लोकमान्यनगर, परभणी-४३१ ४०१.
मो.: ९८८१९२७१०९ फोन : ०२४५२-२२८८७५


अनुक्रमणिका

बाहेरून अगदी अस्वस्थ होत्या. हा परिसंवाद वाचकांना व रसिकांना विलक्षण अंतर्मुख करणारा झाला. या परिसंवादाचे प्रास्ताविक डॉ. व्यंकटेश नुले यांनी केले.

सकाळच्या दुसऱ्या सत्रात प्रा. योगीराज वाघमारे यांच्या अध्यक्षतेखाली सौ. अंजली श्रीवास्तव (करमाळा), ज्योतीराम फडतरे (सांगोला), आप्पासाहेब खोत (कोल्हापूर) यांची रसिकांच्या अंतःकरणाचा ठाव घेणारे कथाकथन झाले. प्रा. योगीराज वाघमारे यांची कथा हृदयस्पर्शी होती. या कथाकथन श्रवणाचा लाभ श्रोत्यांनी घेतला. प्रास्ताविक व परिचय प्रेमचंद नेने यांनी केले.

दुपारच्या सत्रात साकेत प्रकाशनचे प्रकाशक व लेखक बाला भांड यांची मुलाखत रजनीश जोशी व बाबूराव मैंदर्गीकर यांनी मनमोकळेपणाने घेतली. आपल्या लेखनीय भूमिकेबरोबरच प्रकाशक म्हणून कसे घडलो, या क्षेत्रात काय अनुभव आला आणि पुस्तक केवढे समाजचित्रण घडवितात हे बाबा भांड यांनी सांगितले.

शेवटी प्रा. डॉ. गो. मा. पवार यांनी आपल्या भाषणाने समारोप केला. त्यांच्या हस्ते सोलापुरातील ७५ वर्षांच्या पुढील साहित्यिकांचा मनोज्ञ सत्कार करण्यात आला. या समारोपाचे सूत्रसंचालन स्वाती महाळंक यांनी केले होते. याचवेळी म. सा. प. सोलापूर शाखेतील कार्यकारिणी सदस्यांचा सत्कार करण्यात आला. दोन्ही दिवसांच्या कार्यक्रमाची प्रसिद्धी पद्माकर कुलकर्णी चांगल्या रीतीने पार पाडली.

या संमेलनास मसाप पुणे संस्थेचे डॉ. वि. भा. देशपांडे, ह. ल. निपुणगे, नंदा सुर्वे, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, राजन मुठाणे, प्रा. रा. भा. शिंदे, दीपक करंदीकर, प्रभाकर संत आदी सदस्य उपस्थित होते. शेवटी पुढील विभागीय साहित्य संमेलन फलटणला होणार असल्याचे पद्माकर कुलकर्णी यांनी जाहीर केले.

हे विभागीय साहित्य संमेलन यशस्वी करण्यासाठी मसाप सोलापूर शाखेतील सदस्यांनी खूप मेहनत घेतली. श्री. दत्ता हलसगीकर, बाबूराव मैंदर्गीकर, डॉ. सुहास पुजारी, नागेश सुरसे, डॉ. व्यंकटेश नुले, प्रेमचंद नेने, अरविंद जोशी, बदिऊज्मा बिराजदार, निरीश दुनाखे, प्रतिनिधी मसाप सोलापूरचे उपाध्यक्ष पद्माकर कुलकर्णी, शोभना सागर, निर्मला व उत्तरेश्वर मठपती, अरुणकुमार धुमाळ यांनी विशेष परिश्रम घेतले.

संमेलनातील विविध कार्यक्रम, रंगमंचावरील अक्षरसजावट, भव्य वैभवशाली मंडप, स्वादिष्ट भोजन आणि मनःपूर्वक केलेले सत्कार यामुळे हे साहित्य संमेलन यशस्वी तर झालेच पण चिरकाल स्मरणात राहील, असे हृद्य व समृद्ध झाले. प्रथितयश व नवोदित लेखक, कवी, वक्ते यांच्या उपस्थितीने आणि सर्वदूर वृत्तपत्रातील बातम्यांनी ते महाराष्ट्रातील रसिकांपर्यंत पोहोचले, हेच याचे यश आहे.

❖❖❖

**दत्ता हलसगीकर**
अध्यक्ष, मसाप सोलापूर शाखा

---

## देणगीदार

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | १५-१०-२०१० | डॉ. मनोहर जाधव | १,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| २) | २३-११-२०१० | वसुंधरा दिनकरराव शिरोळे | ३,००,०००/- | पुरस्कारासाठी देणगी |
| ३) | २३-११-२०१० | वसुंधरा दिनकरराव शिरोळे (या वर्षाच्या पुरस्कारासाठी) | १५,०००/- | पुरस्कारासाठी देणगी<br>१) मालिनी शिरोळे (स्तंभलेखन)<br>२) डॉ. पुष्पा शिरोळे (आरोग्य)<br>३) ॲड. त्रिंबकराव शिरोळे (ललितलेखन) |
| ४) | ३०-११-२०१० | श्रीधर वि. सहस्रबुद्धे | १,५००/- | न्या. म. गो. रानडे व्याख्यानमालेसाठी देणगी |
| ५) | ६-१२-२०१० | इंदुमती नलावडे | १,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ६) | ६-१२-२०१० | क. दि. सोनटक्के | १०,०००/- | दिवाळी अंक स्पर्धेसाठी (कथेसाठी वाढीव देणगी) |
| ७) | ६-१२-२०१० | मा. अध्यक्ष, पुण्यभूषण फाउंडेशन | ८२,००,०००/- | |
| ८) | ६-१२-२०१० | ८३ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन | १,००,०००/- | |

❖❖❖

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : October to December 2010
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57



प्रेषक
प्रमुख कार्यवाह,

बुक-पोस्ट



**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे-४११०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

अनुक्रमणिका

